पुस्तकाची

# योजना व हेतु

लहानपणापासून मला आपली संवयच की, दिसेल तें पुस्तक वाचावें आणि पुस्तक वाचता वाचता त्यांतील सुंदर सुंदर शब्द व चांगली चांगली वाक्यें वहींत उतरून ठेवावींत. या शब्द मौक्तिकाचा व वाक्य माणिक्याचा संग्रह वर्षांवर्षांला सहजच वाढत गेला, तो इतका कीं, त्याचें स्वतंत्र पुस्तकच छापून घ्यावें असें मला वाटू लागलें. माझ्या 'गांधी–जीवन–चरित्रा' मध्यें मीं असें जाहीरहि करून टाकलें कीं, 'मराठींतील माणिक मोती' या नावाचें एक पुस्तक मी लवकरच प्रसिद्ध करणार आहें. त्याला झालीं सुमारें दहा वर्षें. आता तरी तो 'लवकर' उजाडला, म्हणून मला आनंद वाटत आहे.

शब्द-सौंदर्य व अर्थ-सौंदर्य या दोन्ही दृष्टींनीं स्मरणीय वाटणारे मराठी गद्याचे वेंचे एकत्र गुंफण्याचा माझा हेतु आज अंशतः तरी सिद्धीस जात आहे. मराठींतील पद्य–वाङ्मयाचे उतारे संग्रहीत करणारीं पुस्तकें पुष्कळ निघालेलीं आहेत. श्री. परशुरामपंततात्या गोडबोले यांचें 'नवनीत' हें तर अशा ग्रंथाची गंगोत्रीच! तिच्या जलावर कैक साहित्यिक पुष्ट प्रसन्न होऊन गेले! प्राचीन वाङ्मय मुख्यतः पद्यमयच म्हणून त्यांतील उतारे सर्वांच्या मनीं-मुखीं घोळतात.

गद्य वाङ्मयाच्या बाबतींतहि, आता मराठी भाषेची स्थिति संपन्न व अभिमानाचीच आहे. महानुभावापासून 'मालाकारा'पर्यंत गद्याचे थोडथोडे अंकुर दृष्टीस पडतात, पण मालाकार चिपळूणकरांनीं गद्यवाङ्मयाचा जो वृक्ष मराठीच्या अंगणांत आणून लावला, तो आता 'शब्दांच्या फुलांनीं व अर्थांच्या फळांनीं' चोहीं अंगांनीं बहरून आला आहे आणि त्याच्या शाखा-उपशाखा विस्तारानें पसरत आहेत.

दृष्टि या ग्रंथाला सहजींच लाभली. असें अभिनव स्वरूपाचें पुस्तक प्रकाशित करण्यास, प्रकाशकाचे अंगीं नव्या कल्पनेचें स्वागत करण्याची तयारी व साहित्याच्या सेवेची दृष्टि असावी लागते. ती धारण करून, सध्याच्या तीव्र मंदीच्या काळांतहि, हें पुस्तक 'दि टीचर्स आयडियल पब्लिशिंग हाउस लि.' चे व्यवस्थापक श्री. न. ग. कुलकर्णी यांनीं प्रकाशित केलें व माझी दहा वर्षांची मनीषा पूर्ण केली, याबद्दल मी त्यांचा ऋणी आहें. तसेंच पुस्तकाचें बहिरंग कल्पक व सूचक चित्रानें नटविल्याबद्दल श्री. भय्यासाहेब ओंकार यांचा मी आभारी आहें.

'महात्मा' मासिक, नातूबाग, पुणें २
ता. ७ नोव्हेंबर १९५३

दा. न. शिखरे

# मराठींतील

# माणिक-मोर्ती

• देशाचा, धर्माचा, व आचाराचा खरा अभिमान जागृत राहण्यास बोलणें, चालणें, लिहिणें, शिकणें व विचार करणें मराठींत झालें पाहिजे त्याशिवाय कर्तव्याचा पक्का व कायमचा ठसा आपल्या मनावर उमटावयाचा नाहीं.

• भाषा ही समाजाचें नयन आहे; भाषा ही विचाराचें वाहन आहे; भाषा ही धर्माचें पुरस्करण आहे. भाषेशिवाय मनुष्यप्राणी सभ्यत नाहीं उदार विचाराचे अंकुर ह्या अमृतवल्लीलाच तेवढे फुटतात. ह्या देवतेची मनोभावेंकरून आराधना केली असता सर्व कांहीं प्राप्त होतें.

— इतिहासाचार्य वि. का. राजवाडे (लेख-संग्रह भा. ३)

### देवाचीं नाना रूपें

पवित्र नद्यांच्या रूपानें, विशाळ पर्वतांच्या रूपानें, गंभीर सागराच्या रूपानें, वत्सल गाईच्या रूपानें, उमद्या घोड्याच्या रूपानें, दिलदार सिंहाच्या रूपानें, मधुर कोकिळेच्या रूपानें, सुंदर मोराच्या रूपानें, स्वच्छ व एकांतप्रिय सर्पाच्या रूपानें, पंख फडफडवणाऱ्या कावळ्याच्या रूपानें, धडपडणाऱ्या ज्वाळांच्या रूपानें, प्रशांत तारकांच्या रूपानें सर्वत्र परमात्मा भरून राहिला आहे.

— विनोबा भावे : ( *गीता-प्रवचनें* )

### परमेश्वराचे संदेश

वारे हे भगवंताचे दूत आहेत. हिंदुस्थानांतील कांहीं वारे वरून पवित्र हिमालयावरून येतात, तर काहीं खालून विशाल सागराकडून येतात. ते आपणांस जागृत करतात, आपल्या कानांत गुणगुणतात. परमेश्वराचे अनंत संदेश टकोघटकीं वाऱ्याबरोबर येत आहेत, ते ऐक.

— विनोबा भावे : ( *गीता-प्रवचनें* )

### सृष्टीचें पुस्तक

ही अपार सृष्टि म्हणजे ईश्वराचें पुस्तक आहे. या सृष्टीच्या सुंदर पुस्तकांत सुंदर अक्षरांनीं परमेश्वर सर्वत्र लिहिलेला आहे.

— विनोबा भावे : ( *गीता-प्रवचनें* )

### कीर्ति

सकळ कार्यामध्यें अपकीर्तीचें भय बहुत बागवावें.

— रामचंद्रपंत अमात्य : ( आज्ञापत्र )

## महाराष्ट्राची भक्ति

वडिलाना ' तीर्थरूप ' म्हणतात. पितृस्थान हें एक महान् तीर्थ आहे. त्या दृष्टीनें ज्या महाराष्ट्रात आपण जन्मलों आणि ज्याच्या मांडीवर खेळलों-वाढलों; तो समग्र महाराष्ट्रच आपल्याला तीर्थरूप आहे.

— महादेवशास्त्री जोशी : ( तीर्थरूप महाराष्ट्र )

## मराठीची महती

ज्ञानेश्वरांची गोड गोड भाषा मला चाखावयास मिळाली याची मला धन्यता वाटते. मराठी भाषेच्या प्रांतात-महाराष्ट्रांत-माझा जन्म झाला, म्हणून मला धन्यता वाटते, कृतार्थता वाटते. धन्य ही मराठी भाषा, असें वाटतें. ज्ञानेश्वराची गोड भाषा माझ्या तोंडात वसावी, म्हणून पुन्हां मला जन्म प्राप्त झाला, तरी धन्यता वाटेल.

— विनोबा भावे : ( गीता-प्रवचनें )

## देवमाणसांचें स्थान

आपल्या पशुवृत्तीवर जय मिळवून मनुष्यप्राणी किती उंच चढूं शकतो हें बुद्ध, खिस्त, तुकाराम वगैरे कित्येक महात्म्यांनीं प्रत्यक्ष उदाहरणांनीं दाखवून दिलें आहे. पृथ्वीच्या पाठीवर सर्व देशात, सर्व जातींत, सर्व धर्मांत आणि सर्व युगांत अशीं देवमाणसें उत्पन्न झालीं आहेत. यावरून हें निर्विवाद सिद्ध होतें कीं, जर कोणताहि मनुष्य प्रयत्न करील तर तो त्या स्थानाप्रत पोहोंचूं शकतो.

— आचार्य कालेलकर : ( जीवन आणि समाज )

### गुरु कोण ?

गुरु ही फार थोर वस्तु आहे. मुलातील सुप्त चैतन्य तो जागृत करितो. तो मुलाच्या अतःकरणात शिरून त्याना त्याचा दिव्य वारसा दाखवून देतो. उज्वल ध्येयें त्याच्यासमोर तो ठेवतो.

— साने गुरुजी : ( श्याम )

### शिक्षणाचा उपयोग

शिक्षणाचा खरा उपयोग प्रत्येक धद्यातील माणसास आपापल्या धद्याचें काम जास्त चागलें करावयास समर्थ करण्याचें आहे. स्वधर्म, स्वदेश, स्वभाषा याबद्दल शिक्षणानें एक प्रकारची आस्था व कळकळ लोकाचें मनात उत्पन्न झाली पाहिजे.

— लो. बाळ गंगाधर टिळक : ( केसरी )

### शिक्षणाचें फल

प्रत्येक मनुष्याचें अतःकरण हें एक दैवत आहे, पण तें शिक्षणानें जागृत झालें तरच त्याचा उपयोग. नाहीं-तर दगडी देवाप्रमाणें दगडी अत करणाचाहि उपयोगा-पक्षा उपद्रवच अधिक होतो.

— वि. स. खाण्डेकर : ( काचन-मृग )

### शिक्षणाचें उद्दिष्ट

गुरु नवीन काहीं देत नाहीं. जे असेल तेच प्रकट होण्यास मदत करतो. कोंटलेल्या सुगधाला बाहेर आणतो. जें बद्ध आहे तें मुक्त करणें एवढेंच गुरूचें काम !

— साने गुरुजी : ( आस्तिक )

### ज्ञानाची लालसा

नवीन गोष्ट शिकण्याची ज्याची उमेद गेली तो म्हातारा.

— विनोबा भावे : ( मधुकर

### आईचें थोरपण

आईची पूजा म्हणजे वत्सलतेनें उभ्या राहिलेल्या परमेश्वराची पूजा. माउली म्हणजे निस्सीम सेवेची मूर्ति. उत्कृष्टांतील उत्कृष्ट परमेश्वराची पूजा म्हणजे ही मातृपूजा आहे. आई या शब्दाहून आणखी उंच शब्द आहे कोठें?

— विनोबा भावे : ( गीता-प्रवचनें )

### आईची थोरवी

आई मुलाला जें अंगाई-गीत गातें, त्याला पाळण्यांत हलवितांना, मांडीवर निजवितांना, कुशींत थोपटतांना, खांद्याशीं धरून फिरवितांना, ज्या गोड गोड ओव्या म्हणते–त्यांत सारा सामवेद असतो, सारा गांधर्ववेद असतो. मुलासाठीं जीं शेंकडों औषधें आई जमा करून ठेवते, तिची ती बाळकडवाच्या सामानाची यादी–त्यांत सारा आयुर्वेद सामावलेला असतो. आई मुलाला ज्या कधीं काऊ-चिऊच्या गोष्टी सांगते, राजा-राणीच्या गोष्टी सांगते, आवडती-नावडतीच्या गोष्टी सांगते, त्यांत सारें बाल–वाङ्मय असतें. आई मुलाला कधींकाळीं कळकळीनें जे चार शब्द सांगते, त्यांत सारीं उपनिषदें असतात. ती त्याला फुलें दाखविते, फुलपांखरें दाखविते, गाई-गुरें दाखविते, कावळे–चिमण्या दाखविते, झाडें–माडें दाखविते, चांदोबा दाखविते, त्यात सारें सृष्टीशास्त्र येतें. आईच्या सभोंवतीं सारीं शास्त्रें व साऱ्या विद्या जणूं येऊन उभ्या असतात. आईच्या वात्सल्यांतून साऱ्या कला निघाल्या, साऱ्या विद्या निघाल्या, सारीं शास्त्रें निघालीं, आई म्हणजे बोधजननी, वेदजननी, आई म्हणजे ओम्!

— साने गुरुजी : ( श्यामची आई )

**मातृप्रेमाचा चंद्र**

अनंत निळ्या आकाशाच्या पार्श्वभूमीवर लहानसा चंद्र मिरवितो, त्याप्रमाणें श्यामच्या स्वतःच्या कथांच्या पार्श्वभूमीवर हा मातृप्रेमाचा चंद्र मिरवीत आहे.

— साने गुरुजी : ( श्यामची आई )

**आईचें दूध**

आईच्या दुधाची चव कांहीं न्यारीच असते. तें नुसतें दूध नसतें, त्यांत प्रेम व वात्सल्य असतें. म्हणून तें दूध बाळाला बाळसें देतें—तजेला देतें.

— साने गुरुजी : ( श्यामची आई

**आईची सर**

समुद्रांत अनंत रत्नें असलीं तरी मोत्याचें रक्षण शिंपल्यामुळेंच होत असतें. त्याप्रमाणें या जगात कोट्यवधि बुद्धिमान् माणसें असलीं तरी आपल्या फारशा-न शिकलेल्या व साध्याभोळ्या आईची सर दुसऱ्या कुणालाहि येणार नाहीं.

— वि. स. खाण्डेकर : ( कांचन-मृग

**आईबापांच उदाहरण**

सूर्यचंद्रांना माहीत असो वा नसो, त्यांच्या किरणांनीं कमळें फुलतात ही गोष्ट खरी. आईबापांना व इतर लोकांना माहीत असो वा नसो, त्यांच्या कृत्यांनीं मुलांच्या जीवन-कळ्या फुलत असतात हें खरें.

— साने गुरुजी : ( श्यामची आई )

**ज्ञान देणारी आई**

मुलांच्या शिक्षणांत जास्तींत जास्त वांटा आई-बापांचा असतो, व त्यांतहि आईचा अधिक....खरी शिक्षणदात्री आईच होय. आई देह देते व मनहि देते; जन्मास घालणारी तीच व ज्ञान देणारीहि तीच.

— साने गुरुजी : ( श्यामची आई )

## स्वदेशाचा चित्रपट

ज्यांतील कित्येक अत्यंत रमणीय प्रदेशांस 'अमरभूमि', 'नंदनवन', 'इंद्रभुवन', 'जगदुद्यान' अशा संज्ञा प्राप्त झाल्या आहेत, असा हा आमचा हिंदुस्थान देश आधिभौतिक संपत्तींत कोणत्याहि देशास हार जाईल, किंवा यांतील सृष्ट पदार्थांचा चित्रपट दुसऱ्या कोणत्याहि देशाच्या चित्रपटापेक्षां कमी मनोरम ठरेल असें वाटत नाहीं.

— प्रि. आगरकर : ( सुधारक )

## आमचे राष्ट्रीय पुढारी

ज्यांचे केस पांढरे होऊं लागले होते, ज्यांची सुदृढ उंचसर अंगकाठी कांहींशी वाकल्याचा भास होत होता असे तेजस्वी अंगकांतीचे व सुंदर नाकडोळ्यांचे पंडित जवाहरलाल; कांहींसे ठेंगणें, शाल पांघरलेले, राकट भासणारे, उग्र चर्येचे वल्लभभाई पटेल, देहाचं स्थूलत्व न जुमानतां एखाद्या अवखळ किशोरीप्रमाणें हालचाल करणाऱ्या, शुभ्र केसांच्या आणि गोऱ्या चेहऱ्याच्या आपल्या मत्स्याकृति डोळ्यांच्या नजरेनं, हास्यानं आणि सतत विनोदानं उल्हास पसरविणाऱ्या सरोजिनी नायडू; आणि या सर्वांच्या घोळक्यांत एखाद्या आधिधात्री देवतेप्रमाणें पाय दुमडून डावा तळवा टेकून शुभ्र गादीवर बसलेले गांधीजी.

— ना. सी. फडके : ( उजाडलं ! पण सूर्य कुठें आहे ? )

## देशभक्तीचा मार्ग

देशस्थिति सुधारण्याचा राजमान्य मार्ग म्हटला म्हणजे लोकांस ज्ञान-संपन्न करणें हा होय.

— विष्णुशास्त्री चिपळूणकर : ( निबंध-माला

**स्वतंत्र भारताचें स्वप्न**

स्वतंत्रतेचा उपभोग घेणाऱ्या हिंदुस्थानांत उत्तम ग्रंथकार, उत्तम कारागीर, उत्तम शिल्पकार, उत्तम अर्थशास्त्रवेत्ते, उत्तम तत्त्ववेत्ते, उत्तम चित्रकार वगैरे सर्व प्रकारचे उत्तम लोक निपजून त्यांनी हिंदुस्थान देश उत्तमांतील उत्तम करून ठेविला असता. एशिया खंडांत स्वतंत्रतेचा संरक्षक म्हणून हिंदुस्थानची ख्याति झाली असती.

— शि. म. परांजपे : ( काळांतील निवडक निबंध )

**स्वातंत्र्याची महती**

स्वातंत्र्य नसलें आणि इंद्राचें नंदनवन मिळालें तरी तें शून्य ! स्वातंत्र्य नसलें आणि ऐरावत बसायला मिळाला तरी तो शून्य ! स्वातंत्र्य नसलें आणि कुबेराची संपत्ति मिळाली तरी ती शून्य ! स्वातंत्र्य हें आमचें अस्तित्व आहे, स्वातंत्र्य हें आमचें धन आहे.

— अ. व. कोल्हटकर : ( संदेश )

**स्वातंत्र्याचा फायदा**

जे स्वतंत्र असतात त्यांना स्वतंत्रता मिळविण्याच्या कामीं दुसऱ्यास मदत करण्याचा योग येतो. परंतु जे गुलाम असतात त्यांच्या कपाळीं दुसऱ्यांना गुलाम करण्याचेंच काम येतें.

— शि. म. परांजपे : ( हिंदुस्थान आणि ट्रान्सव्हाल

**स्वतंत्र घर**

"ही मठीच माझा स्वर्ग आहे. कारण येथें मी स्वतंत्र आहे. येथें मिंधेपणा नाहीं. येथें खाल्लेली मीठभाकर अमृताप्रमाणें लागेल, परंतु परक्याकडे खाल्लेली यासुंदीपुरी नको."

— साने गुरुजी : ( श्यामची आई

## राष्ट्राचा जिवंतपणा

राष्ट्र जिवंत आहे कीं नाहीं या सर्वत्र साम्राज्य पसरलें
जिवंत राष्ट्रांतील तरुण त्याच्यासाठ न फाटकीं गोणपाटें,
तयार असतात. ठिकाणीं ठिगळ्या
– वि. स. खाण्ड णखी जोड देत
पसलेटचे दिवे
ने. सहज

## कारागृहांतील प्रवेश

थोड्याच वेळांत चटण संपून सिल्हर जेळचा द्रकाय, आला. लोखंडी विजागऱ्यांच्या दाटा करकरूं लागल्या . त्या तुरुंगाच्या दाराचा जबडा उघडला. मी त्यांत घुसलों तों जबडा बंद झाला, तो पुनः अकरा वर्षांनीं परत उघडला !

– वि. दा. सावरकर : ( माझी जन्मठेप )

## अघोर अलंकारांची शोभा

मी त्या भीषण भव्य तुरुंगाच्या दोन लोखंडी फाटकांच्या मध्यंतरीं असलेल्या भागास भूषविण्यासाठीं जे अनुरूप अलंकार धारण केलेले होते ते पाहण्यांत गर्क झालेलों होतों. निरनिराळ्या प्रकारच्या हातकड्या एकांत एक गुंफून त्यांची ही हिडिस फुलें भिंतीवर लावलेलीं होतीं. मोठमोठ्या पायबेड्या, दंडबेड्या, आणि मनुष्याच्या शरीरास कष्ट देणारीं अशींच अन्य आयुधें समोरच्या भागावर ओळीनें लोंबकळत होतीं. त्या उग्रतेची एक शोभाच दिसत होती. त्या बेयॉनेट–बंदूक–बेड्या–हातकड्यांच्या अघोर अलंकारांनीं तो भीषण तुरुंग असा शोभूं लागे कीं, जसा एखादा मांग उत्तम कपडे घालून फांशीं द्यावयास येतांना शोभतो.

– वि. दा. सावरकर : ( माझी जन्मठेप )

### स्वतंत्र भारताचें

स्वतंत्रतेचा उपमाज-संवर्धक, समाज-रक्षक, समाज-ग्रंथकार, उत्तम काजा होते, तें राष्ट्र वैभवावर चढतें, शास्त्रवेत्ते, उत्तम लागतात. प्रकारचे उत्तम

— साने गुरुजी : ( श्यामची आई )

उत्तमांतील

स्वतंत्रते मातब्बरी

अ॰दव दगडात नाहीं, माणसांत आहे. दामांत नाहीं, घामांत आहे.

— वि. स. खांडेकर : ( हिरवा चाफा )

### श्रमाची प्रतिष्ठा

श्रमात आत्मोद्धार आहे. फुकट घेण्यांत व फुकट देण्यांत पतन आहे. उन्हातान्हांत काम करणारा मजूर, रस्ते झाडणारा झाडू, मलमूत्र नेणारा भंगी, मेलेलीं गुरें फाडणारा ढोर, वहाणा बांधणारा चांभार हे सारे आयतेखाऊ लोकांपेक्षां पवित्र आहेत, श्रेष्ठ आहेत.

— साने गुरुजी : ( श्यामची आई )

### गीता

गीता म्हणजे आलस्याचा निरास, मोहाचा निरास, विलासाचा निरास! गीता म्हणजे नैराश्याचा, स्वार्थाचा, दंभ-मत्सराचा निरास.

— साने गुरुजी : ( श्याम )

### —सत्यावरील निष्ठा

ज्याचा आग्रह धरावा अशी जगांत सत्य ही एकच गोष्ट आहे!

— वि. स. खाण्डेकर : ( सुखाचा शोध )

### मजुरांची वस्ती

धूळ, धूर, आणि कचरा यांचें सर्वत्र साम्राज्य पसरलें होतें. कटड्याला बांधलेल्या दोरीवरून फाटकीं गोणपाटें, फाटक्या गोधड्या, वाकळा, पचवीस ठिकाणीं ठिगळ्या लावलेलीं लुगडीं, त्या गलिच्छपणाला आणखी जोड देत होतीं काचेची चिमणी नसलेल्या डब्याचे घासलेटचे दिवे प्रत्येक खोलीतून धुराचे भपकारे सोडीत होते. सहज पाहिलें असता खोलींत आग लागली आहे कीं काय, असा परक्या माणसाला भास झाला असता.

— भा. वि. वरेरकर : ( धावता धोटा )

### गरिबाची झोंपडी

दिव्याच्या उजेडात मनोहरला काय दिसलें ? स्वच्छ दारिद्र्य. कुडाला पाजवून आणलेले विळे, कोयते व कुऱ्हाडी लटकावल्या होत्या, शिंक्यावरून दोन-चार भोपळे, कोहळे व काकड्या ठेवल्या होत्या मागील बाजूला कोंबड्यांचा झापा होता. कोपऱ्यात नाचणीची बारीकशी वणग होती. माळ्यावर दोन-चार भाताचे डवे. तें भात देखील नव्याचें होतें कुडामध्यें लाटीनें लिंपलेला एक फुटक्या आरशाचा तुकडा होता.

— र. वा. दिघे · ( सराई )

### कामगाराचें जीवन

कुणाचीहि घागर यांदीरहुत मारामारी, निदान शिवी-गाळी झाल्याशिवाय भरलीच जात नाहीं. परळवरच्या ह्या प्रात स्मरणाच्या भूपाळ्याच आहेत. या परळच्या कुरुक्षेत्राला नळावरच्या भांडणापासून सकाळीं सुरवात होते आणि सध्याकाळीं आकाशगंगेच्या तारड्या पा सेवन करून घरीं परत येणाऱ्या कामगाराच्या [illegible] या उत्सवाची शेजारती होते.

— भा. वि. वरेरकर · (

## श्रीमंतांचीं दुःखें

आज गरिबांचें सुख म्हणजे श्रीमंतांचा मत्सर असें झालें आहे. त्या श्रीमंताचा मत्सर करण्यासारखें त्याच्या-जवळ आहे तरी काय? त्याना धड अन्न पचत नाहीं, खरें प्रेम मिळत नाहीं. ही का हेवा करण्यासारखी स्थिति आहे? श्रीमंतानींच गरिबांचा मत्सर करावा अशी स्थिति असते. त्याना मोकळी हवा मिळते, दगडावर पडलें तरी गाढ झोंप येते. श्रीमंतांना श्रमिकांचा हेवा वाटावा असें केलें पाहिजे.

— आचार्य विनोबा भावे : ( भाषणें ).

## स्वावलंबनाचा मान

स्वावलंबन हा पाश्चिमात्य शिक्षणाचा पाया आहे. स्वावलंबनानें मान वर राहते, परावलंबनानें मान खालीं होते. श्रमाशिवाय कांहीं घेऊं नये व कोणीं श्रम केल्या-शिवाय त्याला देऊं नये.

— साने गुरुजी : ( श्यामची आई ).

## निर्माण करा

काहीं तरी निर्माण करा.
विचार निर्माण करा.
धान्य निर्माण करा.
स्वच्छता निर्माण करा.
काहीं तरी मंगळ असें, सुंदर असें, हितकर असें, निर्माण करा; तरच जगण्याचा तुम्हास अधिकार आहे.

— साने गुरुजी : ( श्यामची आई ).

### राष्ट्रोद्धारासाठीं शिक्षण

ज्या राष्ट्राला आपलें डोकें वर काढावयाचें आहे त्याचें तें डोकें पहिल्यानें सुसंस्कृत झालें पाहिजे; म्हणजे तेथील लोक सुशिक्षित झाले पाहिजेत.

— शि. म. परांजपे : ( काळांतील निवडक निबंध )

### आमचे राष्ट्रीय ग्रन्थ

महाभारत आणि रामायण हे निःसंशय अद्भुत ग्रंथ आहेत. रामायण हें मधुर नीति-काव्य आहे, तर महाभारत हें व्यापक समाजशास्त्र आहे.

— विनोबा भावे : (गीता-प्रवचनें

### चरित्र-ग्रंथांचा उपयोग

शील बनविण्याच्या आणि संवर्धनाच्या कामीं अनुकरणीय स्त्रीपुरुषांच्या यथातथ्य लिहिलेल्या चरित्रांचा फार उपयोग आहे.

— घों. के. कर्वे : ( आत्मवृत्त )

### सत्कार्याचा मुहूर्त

चांगले विचार फार वेळ टिकत नाहींत, तेव्हां ते तीव्र असतांनाच मनुष्यानें चांगलें कार्य उरकून घ्यावें.

— घों. के. कर्वे : ( आत्मवृत्त )

### निश्चयाचें बळ

शब्द नकोत, कृती पाहिजे, आणि तीहि निश्चयाची कृति पाहिजे. लोकमताचें बळ निश्चयांत आहे, केवळ समुच्चयांत नाहीं.

— लो. बा. गं. टिळक : ( केसरी )

**आचाराची शुद्धता**

अमुक देशात किंवा अमुक जातींत जन्म होणें हें कांहीं मनुष्याच्या हातचें नाहीं. परंतु सदाचारानें किंवा दुराचारानें वागणें हें मनुष्याच्या हातचें आहे.

— प्रि. आगरकर : ( सुधारक )

**शुद्ध अंतःकरण**

कोणत्याहि मनुष्याची योग्यता धंदावर अगर जातीवर अवलंबून नसून सर्वस्वीं त्याच्या अन्तःकरणाच्या शुद्धीवर अवलंबून असते.

— लो. बाळ गंगाधर टिळक

( लो. टिळक यांचीं धार्मिक मतें )

**शुद्ध मन**

ज्याचें मन किंवा अन्तःकरण शुद्ध तोच पुरुष उत्तम म्हणावयाचा.

— लो. बाळ गंगाधर टिळक : ( गीता-रहस्य )

**स्वच्छता हीच पूजा**

शरीर हें परमेश्वराचें मंदिर आहे. हें मंदिर स्वच्छ व सुंदर राखणें, म्हणजे देवाचीच पूजा आहे. देवानें दिलेले नीट सांभाळणें यांतच खरा धर्म आहे. देवानें जीं सेवेचीं साधनें आपणांस दिलीं आहेत तीं नीट, स्वच्छ, सतेज व समर्थ राखणें हें आपले प्रथम कर्तव्य आहे.

— साने गुरुजी : ( श्याम )

**सत्संगतीचा लाभ**

सत्संगति लाभावयास जशी पुण्याई लागते, त्याप्रमाणें थोर मातापितरें, थोर भावंडें मिळावयासहि पुण्याई लागते.

— साने गुरुजी : ( श्यामची आई )

### स्त्रियांचे गुण

स्त्रियांसारख्या कष्टाळू स्त्रियाच. त्यांनींच शेंकडों खस्ता खाव्या. भारतीय स्त्रियांच्या कष्टाळूपणाला व क्षमावृत्तीला एक भूमातेचीच उपमा शोभेल. दुसरी नाहीं. अशा थोर स्त्रिया ज्या घरांत असतात तीं मला राउळें, देवाचीं मंदिरेंच वाटतात. त्या स्त्रिया ह्याच मी देवता मानतों व माझा माथा त्यांच्या चरणीं नमवितों. दुसरी देवळें मला माहीत नाहीत.

— साने गुरुजी : ( श्यामची आई )

### प्रेमाचें नातें

प्रेमाचें नातें ऐश्वर्यालाहि लाजवील. हें प्रेम जेथें नाहीं ते माड्या-महाल व दिवाणखाने म्हणजे स्मशानेंच होत.

— साने गुरुजी : ( श्याम )

### प्रेमाचें सामर्थ्य

. तलवारीशीं लढावयाची तर ढालच. पण त्या ढालीचा सहन करण्याचा जोर तलवारीच्या मारण्याच्या जोरापेक्षां कमी पडतां कामा नये. दुश्मनाच्या सवालांत जर पांच शेर राग भरलेला असला, तर आपल्या जबाबांत पांच शेराहून कमी प्रेम नसावें.

— विनोबा भावे : ( मधुकर )

### जीवनाचें ध्येय

खरें असेल तेंच बोलावें. उदात्त असेल तेंच लिहावें. उपयोगी असेल तेंच शिकवावें. देशाचें हित ज्यांत असेल तेंच करावें आणि परमेश्वराचें जें सत्य स्वरूप असेल तेंच चिंतीत जावें.

— शि. म. परांजपे (काळांतील निवडक निबंध)

## प्रत्येकाची थोरवी

शेवटीं जगात दुसऱ्याजवळ आहे यातच आनद मानावयास आपण शिकलें पाहिजे. गांधींना रवींद्रनाथ होता येणार नाहीं, रवींद्रनाथाना रामन् होता येणार नाहीं. आपण रडून काय होणार? शेवटीं अद्वैतातच आसरा आहे. जगात खाण्यापिण्याचें वैषम्य दूर करता येईल. परतु चित्रकाराला जर गाणाऱ्याचा हेवा वाटेल तर त्याच्यासाठीं कोणता साम्यवाद आणावयाचा? झेंडूला जर गुलाबाचा हेवा वाटायला लागला तर काय करायचें? झेंडूला पूर्ण फुलवयास आसरा देता येईल, गुलाबालाहि वाव मिळेल. परतु झेंडूचें वैशिष्ट्य गुलाबाला लाभणार नाहीं, आणि झेंडूला गुलाब होता येणार नाहीं. गुलाबानें झेंडूला म्हणावें, "तू किती छान आहेस?" "तूहि किती गोड आहेस?" असें झेंडूनें म्हणावें रामराम म्हणून एकमेकास नमस्कार करावा रामराम म्हणजे तूहि राम व मीहि राम. तूहि गोड व मीहि गोड.

— साने गुरुजी ( श्याम )

## थोरांचें ब्रीद

जो खरा विचारी आहे, ज्याला लोककल्याणाची खरी कळकळ आहे, सत्य बोलणें व सत्यास धरून चालणें यातच ज्याचें समाधान आहे, अशानें क्षुद्र लोकांच्या अवकृपेला, रागाला किंवा उपहास्यतेला या मनास योग्य वाटेल तें तेंच त्यास उचित होय.

— प्रि. आगरकर : ( सुधारक )

संतांचा धर्म

किलबिल करणें हा पांखरांचा सहजधर्म आहे. आईची आठवण होणें हा मुलाचा सहजधर्म आहे. त्याप्रमाणेंच ईश्वराचें स्मरण होणें हा संताचा सहजधर्म आहे.

– विनोबा भावे : ( गीता-प्रवचनें )

सज्जनांचा आनंद

सज्जनांचा स्वभावच हा ! आपला बचाव करणें हा त्याचा धर्म नव्हे ! आपला देह कुरबान करणें हाच त्यांचा धर्म ! लोकांच्या हितासाठीं स्वतःची आहुति पडली कीं तो त्याचा ब्रह्मानंद !

– अ. ब. कोल्हटकर : ( शेतांतलीं पिकें )

साधुत्वाची दृष्टि

वाईटांत वाईट व्यक्तीच्या हृदयांतूनहि भलाईची प्रतीति येते. बाह्य परिस्थितीमुळें त्याच्या हातून एखादी वाईट गोष्ट होताना दिसत असेल, परंतु वाईटांतल्या वाईट माणसातहि एखादी तरी सद्भावना असतेच. त्याच्या हृदयात आम्हांला भगवंताशिवाय कोणाचेंहि दर्शन व्हायला नको.

– आचार्य विनोबा भावे : ( भाषणें )

स्वातंत्र्याचा आनंद

स्वातंत्र्याची प्रगति होत असलेली पाहून सूर्य, चंद्र आणि आकाशातील सर्व लहान-मोठे स्वतंत्रताप्रिय तारे हे आनंदित होत असतात, आणि चोरी, दरवडे व खून यांना पाहून मध्यरात्रीचा काळाकुट्ट काळोखदेखील भयानें थरथर कांपत असतो.

– शि. म. परांजपे : ( पुराणिकाचा )

### मित्राचा स्वभाव

शरीरावर कोठेंहि माशी बसली कीं तिला मारायला हात चटकन् वर होतात. डोळ्यांत कांहीं जातें असें वाटलें कीं, पापण्या चटकन् लवतात. त्यांना तसें करायला सांगावें लागत नाहीं. सज्जन सुहृदांचेंहि तसेंच आहे. तो न सांगतांच मित्राचें भलें करतो. मित्र आपत्तींत पडत असेल तर तो धांवून येतो. मित्र चुकत असेल तर तो सन्मार्ग दाखवतो.

— महादेवशास्त्री जोशी : ( कल्पवृक्ष )

### प्रतिकाराचा मार्ग

विस्तव विझवावयाचा तर पाणी ओतावें,
अंधार पडला म्हणजे दिवा लावावा,

ह्या गोष्टी कोणाला समजत नाहींत ? आणि जर ह्या गोष्टी समजतात, तर क्रोधाला प्रेमानें जिंकावें, बुराईला भलाईनें जिंकावें, कंजूषपणाला दिलदारपणानें जिंकावें, खोट्याला खऱ्यानें जिंकावें, हें संतांचें म्हणणें कां समजूं नये ? त्याहि गोष्टी व्यवहाराच्याच आहेत.

— विनोबा भावे : ( मधुकर )

### मित्राचीं कर्तव्यें

आपलें चुकतें पाऊल जो फिरवितो आणि जाणारा तोल जो सावरतो, तोच आपला खरा मित्र होय.

— ना. सी. फडके : ( गुजगोष्टी )

### नातें व प्रेम

नातें हें झाडाच्या आळ्यासारखं असतं. पण मुळांत प्रेमाचं पाणीच नसलं तर त्या आळ्याचा उपयोग काय ?

— वि. स. खाण्डेकर : ( कांचनमृग )

## मुलांचीं मनें

मुलांचीं मनें हीं झऱ्याच्या पाण्याइतकींच प्रसन्न व पारदर्शी, पण त्याच्याचसारखी विकार-सुलभ असतात फार. पाणी जसें एकादी क्षुल्लकहि वस्तु त्यांत पडल्यानें विचलित व दूषित होऊन जातें, तसेंच असतें मुलांच्या मनाचेंहि.

— ग. त्र्यं. माडखोलकर : ( भंगलेलें देऊळ )

## मुलांची धांवपळ

कातोडयांचीं चपळ पोरें शेतामधल्या ओहोळांतून व ल्हाळींतून लपतछपत पलीकडच्या गारमाळावर निघायला गेलीं. त्यांचा पांगलेला जमाव वाऱ्यावर सोडलेल्या कागदाच्या चिठ्ठयांप्रमाणें पळतांना दिसत होता. सर्वांत मोठीं व चपळ मुलें आघाडीला पळालीं.

— र. वा. दिघे : ( सराई )

## लाडावलेलें जीवन

लाड हें एक अतिशय कृत्रिम जीवन आहे. त्यामुळें लाडास बळी पडलेल्या व्यक्तींच्या मनांत—मग तें मूल असो की स्त्री असो—जगाविषयीं खोट्या कल्पना निर्माण होतात.

— आचार्य कालेलकर : ( जीवन आणि समाज )

## कार्याची प्रेरणा

*पुढचें पडलें तर सारव्यांनी आपलें कर्तव्य बजावणें* यांतच खरें समाधान आहे, रडण्यांत नाहीं !

— लो. बा. गं. टिळक :

## सणाचा आनंद

खरोखर दसरा, कोजागरी, दिवाळी हे सण सारे योग्य-वेळीं आहेत. पाऊस संपत आलेला. सोन्या-सारखीं पिकें तयार झालेलीं असतात. अशा वेळीं जीवनात आनंद नि प्रकाश नाहीं आणायचा तर कधीं ?

— साने गुरुजी : ( सुंदर पत्रें )

## मंगल भाऊबीज

दिवाळीचा शेवटचा दिवस म्हणजे भाऊबीजेचा. त्याच्यासारखा गोड दिवस नाहीं. बहीणभावाच्या प्रेमा-सारखी मंगल पुण्यवान गोष्ट जगात दुसरी कोणती आहे ?

— साने गुरुजी : ( सुंदर पत्रें )

## खेळ

खेळ म्हणजे निष्ठा, खेळ म्हणजे सत्यता, खेळ म्हणजे स्वत:चा विसर.

— साने गुरुजी : ( भारतीय संस्कृती )

## सौंदर्याचें दर्शन

वस्तूच्या जवळ गेल्यानें तिचें सौंदर्य प्रगट होतें, परंतु तिचें काव्य मात्र दुरूनच सुचतें. हा नियम माहीत असल्या-मुळेंच चंद्रसूर्य आणि नवलाख तारे इतक्या दूर जाऊन फिरत असतील काय ?

— आचार्य कालेलकर : ( महादेवाचा प्रवास )

## खरा पुरुषार्थ

यश हें तर स्वतःच्या कर्तबगारीवरच अवलंबून असणार. 'सर्व काम' जर देवीनेंच वसल्या जागीं पूर्ण केलें तर माझ्या पुरुषार्थाचें तें मरणच नाहीं का? निष्क्रिय म्हणूनच नीरस जीवन मग मी कसें सासू?

— महादेवशास्त्री जोशी : (तीर्थरूप महाराष्ट्र)

## पराजयाची भीति

एकवार हार झाली म्हणून काय झालें? प्रत्येक हार ही नव्या प्रयत्नाचें खत म्हणून समजली पाहिजे. पराभवातून मिळणारें शिक्षण कमी महत्त्वाचें नसतें. विज्ञान-शास्त्रज्ञाच्या सफल झालेल्या प्रयत्नाचीं वर्णनें आपण वाचतों; पण हे सफल प्रयोग करण्यापूर्वीं शंभरपट निष्फळ प्रयोग त्यांनीं केलेले असतात, हें कसें विसरून चालेल? सहजासहजीं असंख्य पराभव जो जिरवतो तोच खरा पुण्यवान्.

— आचार्य कालेलकर : (हिमालयाचा

## निराशा टाका

अपयश आलें म्हणून निराश होण्याचें कारण नाहीं. दगडावर एकोणवीस घाव घातले तरी तो फुटला नाहीं, विसाव्या घावानें फुटला समजा, मग ते पहिले घाव का अपेशी समजावयाचे? त्या विसाव्या घावाच्या यशाची तयारी पहिले एकोणवीस घाव करीत होते.

— विनोबा भावे : (गीता-प्रवचनें)

## वाचनाचें फल

अत्यंत शुद्ध, अत्यंत प्रतिष्ठादायक आणि अत्यंत मनोरंजनावह असें करमणुकीचें साधन एक वाचन मात्र होय.

— विष्णुशास्त्री चिपळूणकर : (निबंधमाला)

**संयमाची जरूरी**

वाईट पुस्तकें नयेच वाचूं,
निंदास्तुति नयेच ऐकूं,
वाईट वस्तु नयेच पाहूं,
सदोष वस्तु नकोतच, परंतु
निर्दोष अशा वस्तूंचेंसुद्धां फाजील सेवन नको. चवचालपणा कोणताच नको. दारू-भजी तर नकोतच, परंतु संत्रीं-केळीं-मोसंबींहि फार नकोत.

— विनोबा भावे : ( गीता-प्रवचनें )

**जगावें कसें ?**

जगायचें असेल तर मनुष्य म्हणून जगूं या ! पशू-सारखे, दगडासारखे जगण्याकरितां कांहीं आपण जन्माला आलों नाहीं. आणि मनुष्य म्हणूनच आपण मरूं या !

— वि. स. खाण्डेकर : ( हिरवा चाफा )

**इमानदार रखवालदार**

कुलुपासारखा रखवालदार त्रिभुवनांत सांपडणारं नाहीं. त्याच्यापुढें पैशाची तिजोरी ओतली तरी त्यानें दारास मारलेली मगरमिठी सुटायची नाहीं. पहारा करतांना त्याला डुलकी लागत नाहीं किंवा भूक-तहानेची बाधा होत नाहीं. त्याला उन्हाचा किंवा शीताचा कधीं त्रास होत नाहीं. लोहाराकडून त्याच्या हृदयावर प्रहार करून तें छिन्नभिन्न केलें तर मात्र त्याचा नाइलाज होतो. जुन्या रोमन शिपाया-प्रमाणें चाकरी बजावतां बजावतां मरण्याचें त्याचे ब्रीदच असतें.

— श्री. कृ. कोल्हटकर : ( कुलूप )

## दुपारची भात-कापणी

सूर्य माथ्यावरर येऊं लागला. कड्यावरचें दहिंवर नाहींसें झालें. त्याऐवजीं कृषिकर्मांच्या घामानें भात भिजू लागलें. खालीं शेतात पाणी तापलें. आणि वर उन्हाचा ताप. त्रासलेले कामकरी सपासप भात कापू लागले. सराईची रनाळी दरीदरींत ल्हरी मारूं लागली. त्या स्वच्छ प्रकाशात लावररची गवताची काडीन् काडी अन् पानन्-पान स्पष्ट दिसत होतें.

— र. वा. दिघे : ( सराई ).

## मळणीची तयारी

भात साफ करून वारवण्याचें काम सुरू झालें. दीपाजी भातात पळीज फार ठेवतो म्हणून अंधूची अन् त्याची हुजत झाली. मग शेतकरी कोल्हे–हुकीची वाट पाहू लागले. कोल्हे–हुकीला माप केलें म्हणजे वाटतें असा शेतकऱ्याचा समज आहे. त्याच्या आधीं शेतातील देवींची परडी अन् देवाची जत्रा झाली. मग माडीच्या कण्याची पूजा झाली. मांडीच्या मधीं नारळ ठेवला, उदबत्त्या लावल्या व फुलें वाहिलीं. सर्व काम खुणानीं चाललें होतें. कारण मळणीच्या वेळीं शातता ठेवण्याचा प्रघात आहे. त्या शात खळ्टींत शात खळें एक प्रकारची गूढता आणीत होतें. जणूं शात धरित्री माता शेतकऱ्याना बक्षिस देण्याकरिता तेथें साक्षात् येणार आहे.

— र. वा. दिघे : ( सराई ).

### भूमातेचे अलंकार

चंद्र-सूर्य-ताऱ्यांचीं फुलें तिच्या खोप्यांत आहेत. समुद्राचें वस्त्र ती नेसली आहे. फुलांचे हार तिनें घातले आहेत. हिरवी चोळी तिनें घातली आहे. शेष-वासुकीचे तोडे-तोरड्या तिच्या पायांत आहेत. भव्य महान् महीमाता!

— साने गुरुजी : ( भारतीय संस्कृती )

### सुकाळांतील खेडें

हस्तामागून चित्रा व स्वाती क्वचित पडतात. त्यानंतर सुगी पिकूं लागते. बाजरी काळीशार दिसते. तिळाचीं शेतें पिवळीं दिसतात. शाळू मोत्यांचे घोस घेऊन उठतो. अठरा धान्यें पिकून बाराबलुत्यांची चंगळ उडते. हरळी, कुंदा, बाटूक जनावरांना विपुल मिळूं लागतें. तलाठ्याच्या श्राद्ध-पक्षाला व कोजागिरीला खूप दूध मिळतें. खण, लुगडीं, मुंडाशीं यांची विक्री जोरांत चालते. साळ्याचे माग चालतात. माळ्याचें माळवें विकतें. जत्रा-उरुसांना ऊत येतो. खेळ-तमाशे सुरू होतात.

— र. वा. दिघे : ( पाणकळा )

### दुरून दिसणारे मळे

माळवदावरून पाहिलें कीं, नदीकांठानें व गांवाचे चौफेर संत्री-मोसंबीचे बाग हिरव्या वसाहतीप्रमाणें ठायीं ठायीं दिसतात व त्यांतून साजसकाळीं मोटांचे 'कर्र कर्र घोः' असे आवाज व मोट हांकणाऱ्यांच्या ललकाऱ्या व बैलांना व स्त्रियांना उद्देशून म्हटलेलीं अर्थशून्य गाणीं ऐकूं येतात. उन्हाळ्यांत नदीनाले आटले तरी गारवा हटत नाहीं. चुनखडीमुळें नदीचें पाणी स्वच्छ व पाचक्र बनतें व हिंवाळ्यांत तें इतकें स्वच्छ होतें कीं, डोहाचे तळचीं वाळू मोजून घ्यावी.

— र. वा. दिघे : ( पाणकळा )

### उसाच्या मळ्यांतील चालणें

उसांच्या मळ्यांतील चालणें तें! त्यांतील त्रासापासून एक प्रकारचें सौंदर्य घ्यावयाचें असतें. पुरुष पुरुष उंच वाढलेल्या उंसाच्या गर्दीतून रानवारा सोसाट्यानें आला, कीं सळसळ होणारा आवाज आमच्या पायांखालीं तुडविल्या जाणाऱ्या पाचोळ्याच्या आणि पेऱ्यांच्या आवाजाशीं मिसळला, कीं तो ऐकून मनाला एक प्रकारचा अवर्णनीय आनंद होत होता.

— ना. सी. फडके : (कुलाब्याची दांडी)

### शेतांतील वाट

आतां मोठा रस्ता सोडून आमची गाडी कुंपणाच्या बाजूबाजूनें शेताच्या ढेंकळांतून चालली होती. तो शेतांतील ओबड-धोबड बनावट रस्ता सारखा आणि स्वच्छ थोडाच असणार? एक चाक खालीं, एक चाक वर असें सारखें होत होतें. खडकाच्या एखाद्या मोठ्या टेंगळावरून चाक गेलें कीं मधूनच मोठा हिसका बसत होता. गाडीच्या चाकाखालीं ढेंकळांचा चूर होऊन काळी माती उधळत होती.

— ना. सी. फडके : (कुलाब्याची दांडी)

### डोंगरांचें मखर

घरघाटांतील दुष्काळी भागांतून पांखरें व भिकार खालीं लोटलें. खव्यांटीत पाखरांची बुलबुल सुरू झाली. कारण हिरव्या-निळ्या-जांभळ्या डोंगरांच्या मखरांत सराई राजकन्येप्रमाणें बसली होती.

— र. वा. दिघे : (सराई)

### खेड्यातील गोठा

चुन्यान न सावरलेल्या दगडी भिंतीच्या एका कोनाड्यान रॉकेलच कनड जळन होत, त्याचा तारूस उजेड गोठ्यात पडला होता. गाई म्हशींच्या नेलाच्या आणि पारड्याच्या सावल्या हालत होत्या त्याकड पाहिल की वाटत होत, वाहेरच्या झाडाच्या फांद्याप्रमाणें या सावल्याहि हाल विण्याचा खेळ नारा करीत होता. एखाद्या जनावरान मधूनच हासडून मारलेली लाथ, गाई म्हशींच्या तोंडात भरडला जाणारा कडवा, गुराच्या गळ्यातल्या घटा, एका नाठाळ खोंडाच्या मानेला वाधलेल खालच्या फरशीनर घरगळणार लाकडी ओंढण, म्हशीची धार काढणाऱ्या दादूच्या कासर्टीत आणि उपाच्या सासूनाई आकासाहेव गाय पिळीत होत्या त्याच्या ठोव्या चरवीत पडणाऱ्या धारा—याचे आवाज गोठ्यात भरून राहिले होते

— ना सी फडके (उजाडल! पण सूर्य कुठें आहे!)

### घरातील गाय

ती गाय आमच्या घराची शोभाच होती, आमच्या घराची देवता होती आमच्या घरातील प्रेम व पावित्र्य, स्नेह व सौंदर्य याची जगू ती मूर्ति होती

— साने गुरुजी (श्यामची आई)

### भारताच्या आधार-देवता

चरखा व गाय या भारतीय भाग्याच्या दोन आराध्य-देवता, आधार-देवता या दोन देवताची पूजा पुनरपि जोंपर्यंत सुरु होणार नाहीं, तोंपर्यंत तरणोपाय नाहीं.

— साने गुरुजी (श्यामची आई)

### शेतकींतील आनंदीआनंद

आजूबाजूला गव्हाचीं पिकें सळसळत होतीं; कांचाच्या पोगाऱ्यांनीं व गाजराच्या तुऱ्यांनीं शेतें चित्रविचित्र गालीच्याप्रमाणें दिसत होतीं व त्यांतून बगळे चरत होते. तित्तर व लावी पक्षी आपल्या पिलांचे परिवार घेऊन या शेतांतून त्या शेतांत धांवत होते. फळांना वाट धरून झाडें लवलीं होतीं. संतुष्ट शेतकरी लल्कान्या मारीत गुरें घरीं हाकीत चालले होते. सबंध दिवस चरून पोट भरलेले पक्षी झाडांवर परमेश्वराचीं संध्या-स्तोत्रें म्हणत होते. जिकडे तिकडे शेतकीच्या जीवनाचा आनंदी आनंद चालला होता.

— र. वा. दिघे : ( पाणकळा )

### शेतांतील सौंदर्य

पाचूनें मढविल्याप्रमाणें हिरवींगार दिसणारीं शेतें, पृथ्वीवरील हिरवळीला खेळविण्याकरितां लहान माडांनीं चुडतांच्या रूपानें वांकविलेले आपले हात, गुंजारवाप्रमाणें भासणारें शेतातल्या बायकांचें गीत; पक्ष्यांचे विविध व स्वच्छंदी सूर, पावसाच्या वेळीं क्रोधाविष्ट मनुष्याप्रमाणें दिसणारें पण आतां सौम्य मुद्रेनें पहात असलेलें आकाश, या गोष्टी आकर्षक होत्या.

— वि. स. खाण्डेकर : ( कांचनमृग )

### डोंगराचें टोंक

मळलेल्या वाटेनें जातां जातां ते डोंगराच्या एका टोंकाशीं आले. तें टोंक म्हणजे पृथ्वीला आशीर्वाद देण्याकरतां पर्वतानें पसरलेला हातच आहे असा भास होत होता.

— वि. स. खाण्डेकर : ( कांचन-मृग )

दुष्काळाची मूर्ती

डोळे खोल गेलेले, गालफडें बसलेलीं, दातांच्या कवळ्या बाहेर आलेल्या, झिंज्या अस्ताव्यस्त सोडलेल्या, पोटाला भकाळ्या पडलेल्या, पाठीचीं हाडें बाहेर निघालेलीं, नखें वाढलेलीं, कंबर वाकलेली, हातापायांच्या काड्या झालेल्या, पावलें रक्तबंबाळ झालेलीं, सर्वांगावर वाकळा पांघरलेल्या, गळ्यांत झोळी घातलेली आणि हातांत फुटकें खापर आणि घडकी करवंटी घेतलेली, असें अक्राळविक्राळ स्वरूप धारण करून ही समष्टीरूप क्षुधादेवता जिकडेतिकडे सैरावैरा धावूं लागते.

— शि. म. परांजपे : ( रिलिफ कामें काढण्यांतील उद्देश )

दुष्काळाची भीषणता

एकामागून एक नक्षत्रें कोरडीं गेलीं. उन्हानें जमिनी फाटून जमिनींत वीतवीत रुंद, हातहात खोल भेगा पडूं लागल्या. तलावांचें व विहिरींचें पाणी खराखरा आटूं लागलें. विहिरीच्या तळाला जाऊन भांड्यानें अर्धा तास पाणी खरडून मोट भरावी तेव्हां ती वर येई. एके ठिकाणीं मेलेल्या आईला तान्हें मूल पितांना त्यांना आढळलें. आई कितीतरी दिवसाची उपाशी होती, ती इतकी वाळून कृश झाली होती कीं, जिवंतपणीं तिला दुधाचा थेंब फुटला असता किंवा नाहीं याची शंका होती. एक गाडी रस्त्यानें गाडीवानाशिवाय चालली होती. मालक व गाडींतून जाणारें कुटुंब गाडींत मरून पडलें होतें. एक रोडका कुत्रा मात्र गाडीखालून चालत होता. गाडींतील मेलेल्या लोकांचा इमानी कुत्रा ते लोक मेल्यावरहि त्यांना सोबत करीत होता.

— र. वा. दिघे : ( पाणकळा )

## दुष्काळाची दैना

झाडें पाहिलीं, पोटांत आग पडावी; मळे पाहिले, पोटांत आग पडावी; गोठा पाहिला, दुःख भडभडून यावें; घरीं गेलों, मुलें माझीं नाहींत, म्हणून गळा भरून यावा. गांव पाहिला, लोक सगळे परागंदा, म्हणून जीव कासावीस व्हावा. असा जिकडून तिकडून दुःखाचा वणवाच पेटलेला !

— धनुर्धारी : ( पिराजी पाटील )

## कोंकणांतील निसर्ग-शोभा

कोंकण आणि देश अशा जणूं काहीं दोन शडपाच सह्याद्रीच्या दांड्यानें आमच्याकडे आपोआपच सांधल्या आहेत. कोंकणांत नारळीचीं आणि पोफळीचीं वनेंच्या वनें थाटामाटानें आपल्या चवऱ्या आमच्या मस्तकावर ढाळीत असतात. समोर समुद्राची रणगर्जना चालू असते आणि आम्ही राजाप्रमाणें ऐटींत आपली स्वारी काढीत असतों.

— द. वा. पोतदार : ( महाराष्ट्रांतील सौंदर्य-स्थळें )

## कोंकणची सृष्टि

शेणानें स्वच्छ सारवलेलें तें अंगण, त्यावर काढलेल्या रांगोळ्या, गेरूनें रंगवून स्वच्छ केलेल्या भिंती, त्यांच्यावर काढलेलीं मनोरम चित्रें, भरपूर खुंट्यांवरून व्यवस्थित रीतीनें ठेवलेले कपडेलत्ते, तें प्रशस्त माजघर, आरशासारखें निर्मळ असें देवघर, स्वच्छ आणि सुशोभित अशा मडक्यांनी सजविलेलें स्वयंपाकघर.

— भा. वि. वरेरकर : ( धावता धोटा )

### कोंकणांतील झाडें

कुंपणाकुंपणांतून वासंतिक फुलें उगवलीं होतीं. ' अवचिता परिमळू झुळकला अळुमाळू ' हा ज्ञानियांच्या राजाचा अनुभव पदोपदीं येत होता. माडांचीं चुडतें फताडीं अन् पोफळींचीं अटकर; पण दोन्हींचाहि रंग सतेज, हिरवा. तीं आगरें म्हणजे सागरीं शयन करणाऱ्या श्रीविष्णूच्या निळ्या आस्तरणाला जणूं वेलबुट्टीची किनार ! पुढें तर आम्ही रस्ता सोडून माडांच्या बागेंतच शिरलों. आमच्यावर हिरवीं छत्रचामरें ढळूं लागलीं. एवढें राजवैभव मिळाल्यावर आम्हीं तरी चालण्याची लगबग कां करावी ?

— *महादेवशास्त्री जोशी : ( मुरूडचा जंजिरा )*

### माडांच्या रायांतील सौन्दर्य

जिकडे तिकडे माडांच्या बागाच बागा दिसत होत्या. त्यांच्याकडे पाहिलें की अवार्त्री हिरवागार गालिचा पसरला आहे असा भास होई. समोर लहानसा मोकळा मळा, त्याच्यापलीकडे वाळूच्या टेंकड्या आणि त्याच्यापुढें क्षितिजापर्यंत टेंकलेला शांत निळा समुद्र. आम्ही टेंकडीवर गेलों तेव्हां मालाची बोट जात होती. दूर क्षितिजावर तिच्या एंजिनाचा धूर वरच्या ढगांत हळूहळू मिसळत असलेला दिसत होता. उजवीकडच्या लहानशा तळ्यांतलीं अर्धवट मिटलेलीं कमळें, शेताकडून माडांकडे परत जाणारे पोपट आणि काजूंना आलेला नाजूक हिरवा, पिवळा मोहोर यांत अधिक सुंदर काय होतें असें कोणीं मला विचारलें असतें,तर खरोखरच त्याचें उत्तर मला देतां आलें नसतें.

— वि. स. खांडेकर : ( उल्का )

### कोंकणांत शिरणारा पाऊस

पाऊस मलबारकडून पश्चिम किनाऱ्यानें समुद्राच्या लाटा खडकावर व किनाऱ्यावर आपटीत, नारळी-सुपारीच्या बागांचे शेंडे हालवीत, ताड व शाड वृक्षांना वांकवीत, रायांच्या पाचोळ्यांत आंब्यांच्या राशी पाडीत, सागाच्या जंगलांतील वाळलेल्या पानांवर कोट्यवधि टपोरे थेंब शिंपून मोठें परचक्र आल्याप्रमाणें आवाज काढीत सोसाट्यानें कोंकणांत येतो. मग त्याच्या धारांतून धुरणाऱ्या डोंगरांचीं शिखरें दिसेनाशीं होऊन वरसात सुरू होते.

— र. वा. दिघे : ( पाणकळा

### केळी-पोफळींत शिरलेला वारा

रात्रीं हस्ताच्या पावसाची सर अचानक पडून गेली होती. कुळागारांतल्या केळींचें हात मोडून अन् पोफळींचे शेंडे पिळवटून वाऱ्यानेंहि 'कुंज-क्रीडा' केली होती. त्यामुळें आज सकाळीं बागेंत पोफळांचा नुसता सडा पडला होता.

— महादेवशास्त्री जोशी : ( वृंदा

### दऱ्यांतील अंधार

दऱ्याच्या ज्या खोल भागांवर सायंप्रभा पसरलेली नव्हती. ते भाग झपाट्यानें काळवंडत चालले होते. भरतीचें पाणी किनाऱ्यावरील सखल भागांत जलद पसरावें, त्याप्रमाणें तमिस्रेचा गडद अंधार दऱ्यांच्या या भागांना प्रथम व्यापून टाकीत होता.

— ग. त्र्यं. माडखोलकर : ( अनघा )

### कोळ्याचें जीवन

काहीं होड्यातून धूर निघत होता असें मीं म्हटलें तर कोणीं भलताच सशय घेऊ नये. तो चुलींतला धूर होता. नाळीजवळ ठोकलेल्या फळ्यावर मांडलेल्या चुलीवर त्याची ( कोळ्याची ) भाताची हडी चढली होती. मागऱ्या अंगाला उभारलेल्या टेंगण्या छपराखालीं त्याची निजायची जागा होती. विश्रांतीची, पानतंबाखू खाण्याची जागाही तिथेंच डोलकाठीच्या मुळाशीं. होडी हेंच त्याचें घर, पण स्थावर मात्र नव्हे. जाळीं आणि गळ हीं त्याचीं उपकरणें. माशाचें महापूर पीक पिकविणारा दरिया हें त्याचें शेत. समुद्रावरच त्याचा जन्म जायचा

— महादेवशास्त्री जोशी : ( विजयदुर्ग )

### होड्यानीं आणलेली कमाई

पाण्याला ओहोट होती. त्या अर्धवर्तुळाकार किनाऱ्याला मध्यभागीं सुपाच्या आकाराची जागा कोरडी झाली होती. दोन होड्या तिथें उभ्या राहून त्या जागेवर मारून आणलेल्या शिकारीची रास घालीत होत्या. एकाद्या बाधकामावर गाडीवाल्यानें 'लाभऽऽ दोनऽऽ' म्हणत विटाच्या जोड्या फेकाव्या, तसे ते कोळी माशाच्या त्याच वजनाच्या गुबगुबीत जोड्या कोरड्या जमिनीवर टाकीत होते. रास चढत होती, घरंगळत होती. जगात जिथें जित्या जिवाची कदर उरली नाहीं तिथें मेलेल्याचा कोण केरा ! भरतीच्या ताणावर मच्छीमारीला गेलेल्या होड्या ओहोटीच्या पाण्यावर सुखेनैव परतल्या होत्या.

— महादेवशास्त्री जोशी : ( विजयदुर्ग )

अंधारांतील खाडी

समोर पांच हातांवर पसरलेली वाघोटनची खाडी; पन तिचें पाणी अंधाराशीं एकरस झाल्यामुळें वेगळें दिसत नव्हतें. भोंवतीचें तें चिमुकलें सुंदर गांव झोंपलें होतें; पण ती खाडी मात्र जागृत होती. ती आपल्या लाटांच्या अनंत हस्तांनीं तटाला थपे देत चुबुक चुबुक आवाज उठवीत होती. तिनें झोंपावें अशी जगच्चालकाची आज्ञाच नव्हती, त्याला ती तरी काय करील ! तिच्या दुसऱ्या तीरावरचे डोंगर मात्र केवळ छाया मात्र दिसत होते. जणूं भूतयोनींचे मुकादमच !

— महादेवशास्त्री जोशी : ( विजय

कोंकणचा बाजार

किती तरी वर्षांनीं मी कोंकणच्या भूमीवर पाय ठेवीत होतों. तांबड्या मातीचा रस्ता तुडवीत मुक्काम गांठायला जात होतों. खाजे म्हणजे गोटी शेव ही कोंकणची सर्वसामान्य मिठाई. तिचीं दुकानें दुतर्फा मांडलेलीं होतीं. नारिंगी रंगाचीं ताजीं पोफळें, आगरातल्या विड्याच्या पानांचे पुडे, ' घावरसुन आला जोगी, गोवर माळून बसला अंगीं ' म्हणून कोंकणांतल्या मुली ज्याच्याबद्दल उखाणा घालतात ते कोहळे, वाटोळीं गुबगुबीत पपनसें, पिकून गर्द जांभळीं झालेली हसाळीं, चिनें, कणगरें, अळकुड्या असा खास कोंकणचा कंद पुळांचा संभार पुढें मांडून कुळवाडणी रस्त्याच्या कडेनें विक्रीसाठीं बसल्या होत्या. मी तो मांड पाहूनच तृप्त झालों.

— महादेवशास्त्री जोशी : ( विजय

## सह्याद्रीचें सौन्दर्य

सह्याद्रीच्या हिरव्या खोऱ्यांतील निसर्गाचा सचित्र ग्रंथ चाळतांना कोणाला कंटाळा येईल? गवतांत त्याला सशाची वीण दिसे, तर पायांखालून मातीच्या रंगाच्या लाव्ह्या भुर्रर्र करून आवाज करीत उडत व त्याच्या विचारांची साखळी तोडीत. रानांतील निरनिराळ्या पक्ष्यांची मंजुळ साद ऐकतांना त्याचा जीव वेडा होई. कुठें मोर ओरडत, सकोत्री आडवी जात, कीर-रावे-हरेल वडाच्या झाडावर गर्दी करतांना दिसत.

— र. वा. दिघे : ( सराई )

## डोंगराची शिकवण

प्रत्येक टेकडी आम्हांला भूमीपासून उंच आणि गडाच्या जवळ नेत होती. आम्हांला धाप लागली आहे का घाम निथळला आहे तें पहाण्याची त्यांना काय गरज! उन्नतीचा मार्ग हा नेहमींच कष्टाचा असतो, खडतर असतो, हें त्या मौनानेंच आम्हांला पटवीत होता आणि आम्ही निमूटपणें तें पटवून घेत होतों.

— महादेवशास्त्री जोशी : ( 'प्रचंड' तोरणा )

## डोंगरावरून दृष्टिक्षेप

डोंगर चढतांना अधून मधून सिंहावलोकन करण्यांत करण्यांत मोठी गंमत असते. टप्प्या-टप्प्याला नवे नवे प्रांत दिसूं लागतात. क्षितिजांचा घेर वाढतो. आपण जगापेक्षां उंच असल्याची ऐट चढते. क्षणभर विश्राति घेतल्यानें धामावणारें हृदयही प्रकृतीवर येतें.

— महादेवशास्त्री जोशी : ( तीर्थरूप महाराष्ट्र

### सिंहगडाचें माहात्म्य

या गडाचें माहात्म्य वर्णायचें तर इथें शिवरायांचीं पदतलें उमटलीं आहेत. इथें तानाजीचा आत्मयज्ञ धगधगला आहे. इथें लोकमान्यांनीं हिंदभूच्या स्वातंत्र्याचें मनन-चिंतन केलें आहे; आणि त्यामुळें या भूमीला त्रिगुण पावित्र्य लाभलें आहे.

— महादेवशास्त्री जोशी : ( तानाजीची वीरचर्या

### रायगडाचें दर्शन

तो काळ्या कातळाचा रायगड आतां आमच्यासमोर आडवा पसरला होता. मला वाटलें, तो आपल्या टाचांवर उभा राहिला आहे. वास्तवापेक्षां अधिक उंच होऊन विश्वंभराकडे जणूं उडण्यासाठीं पंख मागतो आहे. चांदण्याच्या रुपेरी रसांत न्हाऊन त्याचें काळेपण अधिक स्वच्छ झालें होतें. 'पुष्पसंगें मातीस वास लागे' म्हणतात, पण इथला प्रकार उलट होता. त्या कातळानें आपल्या अंगावरचें चांदणेंच शाम-शबल करून टाकलें होतें. त्याचें तें दर्शन छातीवर दडपण आणणारें होतें.

— महादेवशास्त्री जोशी : ( शिवछत्रपतींची राजधानी )

### गडाची वाट

बहुतेक गड हे द्वाड असतात. आपल्याला हवी तेथून ते वाट देतीलच असा नेम नसतो. ते मोठे अन् आपण छोटे; तेव्हां त्यांच्या कलानेंच आपल्याला चढावें लागतें आणि त्यासाठीं आधीं निरर्थक कित्येक मैल तुडविणें भाग पडतें.

— महादेवशास्त्री जोशी : ( लोहगड-विसापूर )

रंगांच्या छटा

हत्तीच्या संथ चालीमुळें जसजसे ते डोंगर चढत गेले, तसतशी पंचमढीच्या पंचक्रोशींतील गिरिकंदराची शोभा त्यांच्या डोळ्यांत भरूं लागली. आदल्या रात्रीं पावसाची जोराची सर पडून गेलेली होती. त्यामुळें जंगलांतील पांढुरक्या तांबूस जमिनीवर लाल पाचोळ्याचा थर जागो-जाग पसरला होता व एक प्रकारच्या रानगंधानें वातावरण धुंद होऊन गेलें होतें. खालीं तांबूसलाल जमीन, वर पावसानें स्वच्छ न्हालेल्या साल-वृक्षांची हिरवीगार छाया आणि त्यावर पसरलेलें साभ्र सुनील आकाश यांचें रंग-वैचित्र्य जितकें आकर्षक होतें, तितक्याच पावसानें धुऊन निघालेल्या डोंगराच्या शिलाप्रस्तरांतील काळ्या, निळ्या, जांभळ्या, किरमिजी, मोरपंखी, तांबुस वगैरे निरनिराळ्या रंगाच्या छटाहि मनाला आल्हाद देत होत्या.

— ग. त्र्यं. माडखोलकर : ( अनघा )

काळा कडा

एक अकाळविक्राळ काळा कडा काळ्या किर्र झाडींत डोंगराच्या निम्म्या उंचीवर, डोंगराच्या बैठकीपासून पुढें झुकला होता. एक हजार फूट उंचीचा एखादा काळा-कभिन्न कातोडी डोंगराला पाठ लावून डोकीवर उंच असलेले कपरे पकडून उभा राहिला तर त्याची छाती जशी दिसेल तसा काळा कडा दिसे. काळ्या कड्यानें डोंगराचा निम्मा बोजा न थकतां खांद्यावर घेतला होता. पावसाळ्यांत काळ्या कड्यावरून एकापेक्षां एक प्रचंड धबधबे खालीं कोसळत.

— र. वा. दिघे : ( सराई )

## शिवथर घळ

अर्ध्या घाटांत आल्यावर उजव्या हाताला जणूं पाताळांत असल्यासारखी ती दिसते. गांभीर्य हेंच तिचें जातिनाम म्हटलें पाहिजे. दोन्ही अंगीं तुटलेले काळेभोरकडे अन् पायथ्याशीं दाट हिरवी झाडी, अशा स्वरूपांत ती वरून दिसते. खालच्या वरखें गांवापासून ती सहा मैलांवर आहे, खडकांत लेण्यासारखी खोदलेली आहे. तिची लांबी सव्वाशें फूट अन् रुंदी पाऊणशें फूट आहे. एक लहानगा जलप्रपात अवखळ बालकासारखा तिच्या कुशींत जीव लोटीत आहे.

— महादेवशास्त्री जोशी : ( शिवछत्रपतींची राजधानी )

## गुहेंतील वसतिस्थान

त्या काळ्या पाषाणाच्या उदरांत पोखरून पोखरून एक घुमट कोरला होता. त्या घुमटाच्या पोकळींत बारीक बारीक कोठड्या किंवा ओवऱ्या वरपर्यंत होत्या. त्या खोल्यांचे वर्तुळाकार मजले खालपासून वरपर्यंत एकाला एक लागून राहिले होते. प्रत्येक मजल्याला ओवऱ्यांच्या पुढें एक एक सज्जा होता व तो वर्तुळाकार घुमटांत फिरवला होता. त्या सज्जांत जाण्याकरितां एक जिना दगडांत कोरला होता. तळमजला सोडला तर वरच्या कोणत्याहि कोठडींत जावयाचें म्हणजे या जिन्यानें जावें लागे. गुहेंत दिवसांदेखील काळाकुट्ट अंधार असे. गुहेला एकच तोंड होतें. बाहेरून आंत व आंतून बाहेर जाण्याला हा एवढाच मार्ग होता.

— र. वा. दिघे : ( पाणकळा ).

## डोंगरांतील आवाज

विजांचा कडकडाट, मेघांचा गडगडाट, कोसळणाऱ्या कडेकपारांचे भयंकर आवाज, वाऱ्याचें घोंगावणें, वाऱ्यानें मोडणारीं झाडें-फांद्या यांचा कर्कश आवाज, यांनीं काळदरी घुमूं लागली. वीज पडली किंवा दगड गडगडला किंवा कडा कोसळला कीं त्याच्या आवाजाचे पडसाद काळदरींतून व आसपासच्या खोऱ्यांतून कितीतरी वेळ कंप काढीत राहात. विजेचा चमकारा लवला कीं अंधारांतल्या ढगाला सह्याद्रि व सह्याद्रीला ढग दिसे. ढगानें सह्याद्रीकडे पाहून हुंकारलें कीं तोंडीस तोंड म्हणून सह्याद्रि पण त्या हुंकाराचे प्रतिध्वनि कड्यावरून व घळींतून घुमवी व युद्धाचें आव्हान स्वीकारी. प्रबळ शत्रूप्रमाणें कोणीहि पड खावयास तयार होईना.

— र. वा. दिघे : ( सराई )

## उंचावरून पाहिलेला देखावा

अतिशय उंच उंच वाढलेलीं झाडेंसुद्धां तेथून अतिशय खोल दिसत होतीं. आणि आपल्याकडून आकाशांत फार उंच भराऱ्या मारणारे पक्षीसुद्धां तळच्या जमिनीवरच चालत आहेत कीं काय असा त्या उंच शिखरावरून भास होई. तळचीं माणसें तेथून खुजीं दिसत, शेतकऱ्यांनीं लाविलेलीं ओबडधोबड शेतें कारागिरांनीं तयार केलेल्या नीटनेटक्या व नक्षीदार गालिच्याप्रमाणें भासत आणि विस्तीर्ण नद्या अत्यंत सूक्ष्म अशा रजतधारेची बुद्धि उत्पन्न करीत.

— शि. म. परांजपे : ( शिवाजीचें

## प्रवासांतील अडथळे

प्रवासांत अशीं आडमेळीं यायलाच हवींत; त्याशिवाय त्याला रुचि नाहीं. पण ' आतां काय करावें ' अशी विमूढ अवस्था येण्याच्या क्षणीं त्या दूर व्हायला पाहिजेत. चंद्रावर ढग तर वाहून यावेत, पण तो कायमचा मात्र आच्छादला जाऊं नये, यात खरी गंमत आहे

— महादेवशास्त्री जोशी : ( प्रचंड गोरणा )

## डोंगरदरींतील प्रवास

अरण्यात मधेंच एखादा मठ दिसावा तशीं हीं स्टेशनें दिसत. भागवथीपुरम् स्टेशन सोडल्यापासून टेनमलाइपर्यंत चार मोठे बोगदे लागले. तारेवर कसरत करावी त्याप्रमाणें आमची गाडी हळू जपून तोल सांवरून चालली होती. उंच प्रचंड पर्वत-शिखराची रांग आमच्या गाडीवर डोकावून पाहात होती आणि एखाद्या खोल भयंकर दरीला वळसा घालून गाडी खालीं जाऊं लागली कीं ती अगदीं दरींत कलंडत असल्याचा भास होई.

— सौ. कमला फडके : ( त्रिवेंद्रमची सफर )

## घाटांतला मुक्काम

ऐन मध्यरात्र असावी. मी अंथरुणावरून उठून बसला राहिलों, खिडकी उघडली आणि बाहेर डोकावून पाहिलें. गाडी रिव्हर्सिंगवर उभी होती. आकाश अनपेक्षित ढगांनीं भरलेलें होतें. एखादी चांदणी मध्येंच लुकलुकलेली दिसत होती. एका बाजूला सह्याद्रीचा डोंगर एखाद्या अजस्र कृष्ण-छायेप्रमाणें दिसत होता. दुसऱ्या बाजूला पश्चिमेकडील वाऱ्याचा विस्तार एखाद्या झोंपी जाऊन घोरत पडलेल्या राक्षसासारखा भासत होता.

— ना. सी. फडके : ( कुलाब्याची दांडी )

### वणवा

आमची नजर समोरच्या डोंगरावर गेली, तर तिथें वणवा लागलेला. उम्याआडव्या तेजाळ कांपऱ्या रेषेंत ती आग चरत चरत जात होती. मधूनच किराळें उडत होतीं. धूमरेखा आकाशाच्या पोकळींत रिगत होत्या. उजवीकडचा भलामोठा तुकडा करपून काळा ठिक्कर पडला होता.

— महादेवशास्त्री जोशी : ( राजगड )

### कड्याच्या पायथ्याशीं

कड्याखालचें रुंद पाठीचें तें टेंकाट. जणुं पाणघोडाच. त्याच्या अंगावरचें तें मेट. डाव्या हाताच्या डोंगरावर एकाखालीं एक कुणगे आखल्यामुळें निर्माण झालेली ती जणुं दिव्य लोकाची सोपानपरंपरा किंवा ' भुवनसुंदरा 'ची 'त्रिवलीलत उदरशोभा' उजव्या हाताला खडेगोटे नसलेल्या आणि सुकल्या गवतामुळें पिवळसर दिसणाऱ्या, एकमेकींत आडव्या-तिडव्या घुसलेल्या त्या टेंकड्या जणुं मातबर जमीनदाराच्या अंगणांत येऊन पडलेल्या भाताच्या राशीच.

— महादेवशास्त्री जोशी : ( तानाजीची बीरशय्या )

### पहाडी प्रदेश

जिकडे तिकडे काळे पहाड आपल्या रुंद छात्या काढून उभे होते. मोटमोठाले तुटलेले कडे पावसाळ्यांत उतरणीवरून लोटत येऊन कशाला तरी अडकून अधांतरीं लटकून राहिले होते. ते केव्हां तुटतील याचा नेम नव्हता.

— र. वा. दिघे : ( पाणकळा )

### पावसाळ्यानंतरचे डोंगर

पावसाळा संपला होता. श्रावणातला ऊन पाऊस संपला होता, भाद्रप्यातील तापी बंद झाल्या होत्या, अश्विनाचें पोनेरी उन्ह तिरपें होऊन हिरव्या खलाटीवर पडू लागलें. चौफेर पावसानें हिरवळलेले डोंगर, निळें आकाश डोक्यावर घेऊन उभे होते. मधून काळ नदी खळखळ करून वाहत होती.

— र. वा. दिघे : ( सराई )

### डोंगरावरील वैराग्य

समाधिनंतर व्युत्थान व्हावें त्याप्रमाणें आम्ही टेकडी-वरून खालीं उतरलों. उतरताना निराळा रस्ता पकडला. जवळ जवळ सुकून गेलेल्या पानाची शोभा चोहोंकडे दिसत होती, यामुळें जेथें तेथें वैराग्यचें सूचन होत होतें.

— आचार्य कालेलकर : ( महादेवाचा प्रवास )

### सरोवराकाठचा पर्वत

येथें ( झारीच्या वाटेवर ) समोरच्या बाजूला एक एक उच पर्वत आसमंतातल्या जंगलास आशीर्वाद देत उभा होता आणि पाण्यात पाहणाऱ्याना आपलें उल्टें दर्शन घडवीत होता. दाढी राखून डोकें तासणाऱ्या मुसलमाना-सारखें या पर्वतानें आपल्या पायथ्याशीं जंगल वाढून डोक्याची चम्पी केली होती.

— आचार्य कालेलकर : ( नदीचें सरोवर )

मृत्यूचे सर्व फायदे ज्यात आहेत, पण तोटा मात्र एकहि नाहीं, अशी एक गोष्ट जगात आहे आणि ती म्हणजे झोंप !

— अनंत काणेकर

## हिमालयातील सोनें-रुपें

मीं हिमाळयात असा देखावा एकदा पाहिला होता. खालीं स्वच्छ व शुभ्र बर्फ व वर पिवळें अनंत अंबर. खालीं चांदी रुप्याचीं शिखरें व वर सोन्याची छत्री!

— साने गुरुजी (आस्तिक)

## हिमालयातील पहाड

अरेबियन नाइट्समध्यें किंवा पंचतंत्रात एका गोष्टींतून दुसरी गोष्ट फुटते त्याप्रमाणें या पर्वतशिखरावर मांड ठोकून बसलेला एक नवाच डोंगर उपस्थित झाला! चार मजुराच्या खांद्यावरील आरामखुर्चीवर एखादा अमीर बसला असावा, त्याच गंभीर भव्यतेनें आणि आपल्या महत्तेचें परिपूर्ण भान असावें अशा स्वाभाविकपणें तो पहाड विराजमान झाला होता. तो जर उभा राहिला असता तर? तर मला वाटतें आकाशाचा चांदवा फाटलाच असता.

— आचार्य कालेलकर (हिमालयातील प्रवास)

## हिमालयातील इंद्रधनुष्य

हिमालयाच्या हवेंत थोडी जरी आर्द्रता जमली कीं इंद्रधनुष्याचें दर्शन हें घडायचें! ह्या वेळीं समोरच्या डोंगरावर-डोंगरावरील आकाशात नव्हे तर डोंगराच्या वक्षस्थळावर इंद्रधनुष्याचा एक पट्टा दृगोचर होत आहे. हिरव्या झाडीच्या पार्श्वभूमीवर तें निघाल्यामुळें थोडेसें कृष्ण होतें परंतु त्यामुळें त्याच्या मोहकतेंत कोणतेंच न्यून आलें नव्हतें. पळती मोटार जसजसें आपलें तोंड फिरवी, तसतसें इंद्रधनुष्यहि स्थानांतर करीत असें.

— आचार्य कालेलकर (विद्याश्रमाचें पुनर्दर्शन)

**मेघराज आला**

आणि मग पाऊस येतो. जणूं श्यामल कृष्णच इंद्र-धनुष्यानें सजून येतो. आकाशात वाद्यें वाजूं लागतात. आला, मेघराज आला. धरित्रीला भेटायला भाऊ आला. प्रेमानें ओथंबून आला. आणि कवि म्हणतो "हा भाऊ रिकाम्या हातानें नाहीं आला. त्यानें हिरवें पातळ आणलें आहे आणि निर्झराच्या संगीताच्या तोरड्या आणल्या आहेत."

— साने गुरुजी : ( सुंदर पत्रें )

**ढग जमूं लागले**

दूर क्षितिजाच्या एका कोपऱ्यात तळहाताएवढा एक काळा ढग हळूच पाण्यातून वर डोकावून पहाणाऱ्या माशा-प्रमाणें हालचाल करीत होता. त्या ढगाकडे मी कौतुकानें निरखून पाहूं लागलों. गुलामगिरीनें गांजलेल्या राष्ट्रांत एकाद्या एकाकी देशभक्तानें आपलें अस्तित्व धैर्यानें दर्शवावें, तसा तो छोटा मेघ वाटला मला. मी पाहत होतोंच. क्षणाक्षणाला त्याचा आकार वाढूं लागला. हा हा म्हणता त्या माशाचें मांजराच्या पिलांत आणि त्या काळ्या मांजराच्या पिलाचें मोठ्या प्रचंड हत्तींत रूपांतर झालें. तो काळा हत्ती पुटें पुढें सरकूं लागला. त्याच्यामागून अनेक लहानमोठे हत्ती दिसू लागले. रानटी हत्तींच्या कळपानें सारें आकाश व्यापून टाकलें. आतां लवकरच पाऊस पडणार, आपल्या सोंडेतून भरून आणलेलें स्वर्गंगेचें पाणी छोटेमोठे हत्ती तापलेल्या पृथ्वीवर उधळून तिला शांत करणार, या कल्पनेनें माझें मन आनंदित झालें.

— वि. स. खांडेकर ( कुठं आहे तो मेघ )

### गहिंवरलेलें आकाश

बाहेर एकाएकीं प्रचंड वादळ सुरू झालें. धों धों वारा वाहत होता. आकाशांत अकस्मात् ढगावर ढग आले. एका क्षणापूर्वी तेथें अनंत तारे चमचम करीत होते, आता एकहि दिसेना. प्रसन्न आकाश शतधारांनीं रडूं लागलें.

— साने गुरुजी : (क्रांति)

### काळ्या ढगांचें छत

भाद्रपदाच्या पहिल्या दिवशीं आकाशांत पावसाचें अगदीं चिन्ह नव्हतें, उलट त्या दिवशीं सकाळीं पाऊस उडवणारें धुकें दरींतून निळ्या डोंगराना वाफारा देत होतें. परंतु त्याच दिवशीं संध्याकाळीं एक मोठा पांढरा ढग दक्षिणेच्या बाजूनें सारंग खिंडींतून हलूहलूं लोटत लोटत आला व डोंगराच्या अंगानें काळ्या कड्यापर्यंत पसरला. थोड्याच वेळात त्यानें काळ्या कड्याला दुपेटा बाघला व काडदरीच्या रानभागावर डोंगरकट्यारीवर अंधेरी केली. काळ्या कट्यापासून वर भीमाशकर व खालीं महाबळेश्वर-पर्यंत एकाच काळ्या ढगाचें एक काळें छत तयार झालें. विजा, ढग, पाऊस, वारा यांनीं सह्याद्रिवर युद्ध पुकारलें. टपोऱ्या थेंबाच्या पावसाची एक मोठी सर सुरू झाली. पावसाचे थेंब इतके मोठे होतें कीं, पागोळ्यात पाऊस माईना.

— र. वा. दिघे : (सराई)

### पर्जन्याचें आगमन

वाजत गाजत गर्जत येऊन त्यानें तापलेल्या कस्तुरीच्या काळ्या वावरात अमृताची बरसात सुरू केली कीं लाखों चमेळे फुलल्याप्रमाणें मातीचा सुगंध पसरतो.

— र. वा. दिघे : (पाणकळा)

## ढगांचा तट

आमची होडी किल्ल्याच्या प्रवेशद्वाराच्या रोखानें निघाली. सकाळचा पाऊस आतां नव्हता; पण ढगानीं सूर्यापुढें उगाच तट उभारून ठेवला होता. अधूनमधून तो टासळे आणि किल्ल्यावर प्रकाशाचा लोंढा ओते. पण पुढें तो ढगाआड झाला कीं समुद्राच्या पृष्ठभागासह उदासवाणा वने. 'तुष्टा रुष्टाः क्षणे क्षणे' अशी त्याची आणि त्याला उत्सुकतेच्या डोळ्यानीं पाहणाऱ्या आमची अवस्था होत होती.

— महादेवशास्त्री जोशी : ( मुरुडचा जंजिरा )

## पावसाळी आभाळ

एकदम गार वारा सुटला. पावसाचीं चिन्हें दिसूं लागलीं. त्यानीं वर आकाशात पाहिलें तों ढग गोळा होऊं लागले. जणू कोणी मोठा मेंढपाळ हजारों मेंढ्या, बकऱ्या, कोंकरें घेऊन चालला होता. का आकाशात मोठी सर्कस उतरली होती ? किती प्रकारचीं हीं जनावरें ! सिंह आहेत, वाघ आहेत, घोडे आहेत, हत्ती आहेत, ससे आहेत, कुत्रे आहेत; रानटी व माणसाळलेलीं दोन्हीं प्रकारचीं जनावरें तेथें होतीं. आणि ते पहा भुजग ! शेंकडों फणाचे भुजंग. मध्येंच त्याच्या फणावर मणी जणू चमकत व डोळे दिपत. सर्कशींत सापाचेहि खेळ आहेत वाटतें ? कोणी गारुडीहि सर्कशींत आहे वाटतें. सापाना अगावर खेळवणारा कोणी अमेरिकन थोरो त्या वरच्या सर्कशींत होता का ?

— साने गुरुजी : ( क्रांति )

## पर्जन्य-वृष्टीचें दृश्य

पावसाची झिम्‌झिम् सुरू होती. पण पश्चिम क्षितिजावरल्या एका पांढुरक्या ढगाच्या आडून लकाकणारें सूर्यबिम्ब खिडकीच्या धूसर तावदानानें तळपत असलेल्या विद्युद्दीपाची आठवण देत होतें. त्याचा फिका प्रकाश अतिवृष्टीनें चिंब झालेल्या सृष्टीवर पडून तिला विशोभित पांढुरता आली होती. त्या प्रकाशात छावलेल्या घरावरील पावसानें शेवाळून बुरसलेल्या कौलारात जो एखादाच नव्या कौलाचा लाल लाल रंग दिसे, तो एखाद्या जुन्या मलिन वस्त्राला नव्या धाग्यानें केलेल्या रफूसारखा वाटत होता.

— ग. त्र्यं. माडखोलकर : ( चंदनवाडी )

## पहिल्या पावसाची भेट

वापयात पाचूचा रोहे रुजला. नीलमण्याना अंकुर फुटल्याप्रमाणें वेलीचे ताणे पसरले. इतक्यात मळवाचा एक पाऊस पडला. जणू काय मोत्याचाच वर्षाव झाला. जिकडे तिकडे मातीचा सुगध सुटला. गारीगार झालें. आंबा मोहरास आला होता. त्याला हुशारी येऊन तो जोरानें बहरला. घमघमाट पसरू लागला. कोकिळा ठायीं ठायीं आम्याच्या पालवींतून टाहो फोडू लागल्या.

— र. वा. दिघे : ( पाणकळा )

आपल्या पाणीदार डोळ्यातील अक्कल आणि आपल्या पिळदार मनगटातील जोर हें प्रत्येकाचें खरें सर्टिफिकीट आहे. तें विसरून साहेबाच्या सहीचीं चिटोरीं तसविरींत बसविण्यात काय भूषण आहे ?

— शि. म. परांजपे : ( सर्टिफिकीट )

## सकाळचा पाऊस

दुसऱ्या दिवशीं सकाळ उगवली ती काळ्या ढगांच बुरखा पांघरून. मधून मधून पाऊसहि गुलाबपाणी शिंपडूं लागला. पूर्वेला सूर्य उगवला होता हें निश्चित, पण ढगांनीं त्याच्या दर्शनांत व्यत्यय आणला होता. चैत्रांतला पाऊस म्हणजे आवडता पाहुणा. पण तो सकाळींच आल्यामुळें बेभरंवशाचें कूळ समजून आम्ही त्याची पर्वा न करतां मार्गस्थ झालों.

— महादेवशास्त्री जोशी : ( मुरुडाचा जंजिरा )

## पावसाळ्याचें वर्णन

मृग आणि आर्द्रा हीं दोन नक्षत्रें बरसून गेल्यामुळें आकाश किंचित् निवळलें होतें. सभोंवतालच्या रखरखीत टेकड्यावर वर्षाऋतूच्या सिंचनामुळें हिरवळीची रोमराजी थरारून उठली होती व काळ्याकांठची झाडी सगळी न्हाऊन निघाल्यामुळें तिच्या हिरव्या रंगाला मनोहर तजेला आला होता. दूर अंतरावर कुठें तरी पडत असलेल्या पावसाचे जे गर्द निळे पट्टे क्षितिजाच्या पश्चिम भागावर दिसत होते, त्यांतून सूर्याचें बिंब जेव्हां मधेंच दृष्टीस पडे, तेव्हां स्वतःच्या मस्तकावर कोसळणाऱ्या स्वर्गंगेच्या झोतांत पृथ्वी बुडून जाऊं नये म्हणून शंकरानें दयार्द्र होऊन आपला तृतीय नेत्र तिला दटावण्यासाठीं उघडला आहे कीं काय असा भास होई; व त्या दिशेनें येणाऱ्या थंड वाऱ्याच्या झुळुकेबरोबर जो पाण्याचा एखादा दुसराच टपोरा थेंब अंगावर मधूनच पडे, तो त्या दयाघनाचा करुणाश्रु असावा.

— ग. त्र्यं. माडखोलकर : ( अनघा )

## पावसाची सर

अगदीं लख्ख ऊन पडलेलें दिसतें बाहेर ! छत्री ही पदवी-प्रमाणें असतें; म्हणजे अनेकदां तिचा उपयोग होण्याऐवजीं तिचें ओझें मात्र माणसाला वहावें लागतें, अशा कल्पनेनें आपण तिच्याकडे तुच्छतेनें पहात ऐटीनें हात हालवीत घराबाहेर येतों; पण आपण चार पावलें चालून जातों न जातों तोंच पांढऱ्या शुभ्र मलमलीच्या सदऱ्यावर शाई ओतून घेणाऱ्या पोराप्रमाणें दिसणारा एक छोटा ढग हळूंच आपल्या डोक्यावर येतो आणि भरभर पाण्याचे तुषार आपल्या अंगावर उडवूं लागतो.

— वि. स. खाण्डेकर : ( श्रावण )

## पावसाच्या सरींत

एवढा वेळ झिम् झिम् करणाऱ्या पावसाला जोर चढला. आडव्यातिडव्या सटसडाटांनीं तो आम्हांला झोडपूं लागला. हातांतल्या छत्र्या केवळ ' ओझ्याला काळ ' ठरल्या. कपडे भिजून अंगाला बिलगले. पावसाला भिऊन एखाद्या झाडाच्या आसऱ्याला जावें तर त्याचे ओथबळे पावसाच्या थेंबापेक्षांही टपोरे. शेवटीं एक एक पाऊल पुढें टाकीत राहावें हेंच श्रेयस्कर ठरलें.

— महादेवशास्त्री जोशी : ( तीर्थरूप महाराष्ट्र )

कोणतेंहि काम असो, त्यांत हृदय ओतलें पाहिजे. तें मनःपूर्वक केलें पाहिजे. एक टांका घालण्याचें असो किंवा महान् ग्रंथ लिहिण्याचें असो, पावलोंपावलीं परिपूर्णतेचें स्मरण माणसानें ठेवलें पाहिजे.

— साने गुरुजी : ( क्रांति )

## शेवटची झिम् झिम्

सरल्या पावसाळ्यांतली एक विरळ सर बाहेर झिम्-झिमत होती. अगदी निःशब्दपणें, हवेवरच तरळत, जणूं नाइलाजानेंच कृत्तिकेच्या नक्षत्रासारख्या सूक्ष्म थेंबांचा एक एक पुंजका खालीं....खालीं...घसरत होता. चार महिने वाहून वाहून पावसाच्या धारा कंटाळल्या होत्या, विमनस्कपणें वाट्याला आलेलें काम चालू ठेवीत होत्या. वाटा वाहून, न वाहिल्यासारख्या करीत; झाडांची लसलसलेली हिरवीगार पानेंहि त्यांच्याकडे लक्षच न दिल्यासारखें करीत.

— कुसुमावती देशपांडे : (झिम्‌झिम्)

## वेगानें येणारा लोंढा

लाल व गढूळ पाण्याचा एक प्रचंड लोंढा नदीच्या कोरड्या पात्रातून, रंधा मारलेल्या लाकडाच्या ढलप्याप्रमाणें गुंडाळत, अक्राळविक्राळ आवाज करीत, तोंड वासलेल्या सापाप्रमाणें लोटत येतो. लोंढ्याच्या तोंडाशीं असलेली पाण्याची भिंत खळखळ आवाज करीत, मुटपत पुढें सरकूं लागली म्हणजे तिच्यांतून गवताच्या काड्या, टरबुजें, काकड्या, कलिंगडें,भेल्या, नदीच्या पात्रांत वाळत घातलेल्या मिरच्या, गाड्या, वेट, शेळ्या-मेंढ्या, क्वचित् माणसाचे मुडदे वरून खालीं व खालून वर जातांना दिसतात. नदीच्या पात्रांतील लोक ' नदीला जीभ फुटली, जीभ फुटली, ' असा इतरांना इशारा देत जीव घेऊन पळत सुटतात.

— र. वा. दिघे : (पाणकळा)

### धबधब्याचें शब्द-चित्र

सकाळीं पाऊस थोडासा थांबला व धुकें नाहींसें झालें; तेव्हां काळा कटा व इतर डोंगर यांचें दर्शन झालें. धुक्याचा पडदा निवळल्यानंतर डोंगरावर पावसाचे काय परिणाम झाले तें दिसू लागलें. भैरव नेहमींपेक्षां दुपटीनें फुगला होता. दोन-दोन,तीन-तीन मैल लांबीच्या डोंगराच्या धशी कोसळून डोंगराचा भूगर्भ उघडा पडला होता. ते डोंगर, नरसिंहानें हिरण्यकशिपूचा कोथळा फोटल्याप्रमाणें रक्तबंबाळ दिसले. रक्ताऐवजीं त्यांतून तांबड्या पाण्याचे प्रवाह निघाले होते. कोसळलेल्या डोंगराच्या दिगाऱ्याखालीं सागाचीं जगलेंच्या जंगलें गडप झालीं. ठिकठिकाणीं प्रचंड वृक्ष मुळातील माती वाहून गेल्यामुळें आडवे झाले होते. कैक डोंगर गर्भांत पाणी मुरून फुगले व त्याच्या बाजवा उकरून खालीं कोसळतात कीं काय अशी तळच्या गावाना भीति पटली. कैक तास बिळातून पाणी राहिल्यामुळें पुष्कळ साप बिळातल्या बिळात मरून गेले.

— र. वा. दिघे : (सराई)

### धबधब्याचा ठेका

आम्ही सूर्यकिरणाकडे पाठ फिरवून पुढें निघालों—तोंच एकाएकीं सहस्रधाराचा धबधबा उसळत असलेला दिसला. उंचावरून स्वच्छ पाणी घट्ट झालेल्या मातीच्या भिंतीवरून कोसळतें आणि निनाद करतें-एक लय,एक ताल यांत तें मग्न असतें. आजूबाजूला कोणी आहे कीं नाहीं हें पाहण्याची काय गरज ? काय होत आहे त्याची त्याला काय पर्वा ? धब धब धब धब अव्याहत चालूच आहे.

— आचार्य कालेलकर : (सहस्रधारा)

## धबधब्याचें दर्शन

समोरून येट डाव्या टोंकाला ' राजा ' धबधबा अर्धचंद्राकार शिलेवरून खालीं उडी घेत होता. त्याचें पाणी पावसाळ्यांतील चिखलानें कॉफी-रंगासारखें दिसत होतें. पण जास्तींत जास्त पाणी राजालाच मिळतें. छाती फुलवीत फुलवीत जेव्हां तो तीरासारखा सरळ खालीं पडतो, तेव्हां निसर्गाची शक्ति किती अतुल आहे याची कल्पना येते. ' राजा ' धबधब्याचा विस्तारहि कांहीं लहानसहान नाहीं; आणि त्याच्या दोनही अंगांस मोठमोठ्या मोत्यांचे किती तरी सर लोंबत असतात ! खरोखर हा धबधबा ' राजा ' या नांवाला पात्र आहे.

— आचार्य कालेलकर : ( जोगचा धबधबा )

## धबधब्यांतील इंद्रधनुष्यें

येथील इंद्रधनुष्याची शोभा अलकेश्वराच्या मनांतहि ईर्षा उत्पन्न करीत होती. मात्र हीं इंद्रधनुष्यें स्थायी नव्हतीं. वाऱ्याची लहर जशी दिशा बदले त्याचप्रमाणें सीकरपुंज आपलें स्थान बदलीत आणि इंद्रधनुष्यें, पार्वतीसमवेत शंकरानें नाचावें तशीं; इकडून तिकडे धांवत होतीं. क्षणांत क्षीण होत तर क्षणांत मयासुराच्या प्रासादाची शोभा धारण करीत. कर्माबरोबर जसें त्याचें फलहि येतें त्याप्रमाणें प्रत्येक धनुष्याबरोबर त्याचें प्रतिधनुष्यहि आपला वर्णक्रम बरोबर उलटा करून उपस्थित होत होतें. आम्हीं स्थान बदललें तर या सुरधनुष्यांनींहि आपलें स्थान बदललें.

— आचार्य कालेलकर : ( जोगचा धबधबा )

### धबधब्याच्या कडेचे पर्वत

चारहि प्रपातांचें जणू रक्षण करण्याकरिताच डाव्या व उजव्या अंगाना दोन मोठमोठे पर्वत आहेत. उभ्या उभ्या ते आणखी काय करणार ? प्रपाताची अखंड गर्जना प्रतिक्षणीं प्रतिध्वनित करीत राहणें, इंद्रधनुष्य धारण करणें व ल्हानमोठ्या वनस्पती अंगावर लेवून रोमांचित होत रहाणें हाच त्याचा अविरत उद्योग होऊन बसला आहे !

— आचार्य कालेलकर ( जोगचा धबधबा )

### लाल धबधबा

पाऊस थांबला तेव्हां सोनेरी उन्हांत 'भैरव' धबधबा काळ्या कड्यावरून प्रचंड जयघोष करीत खालीं काळ नदींत कोसळूं लागला. त्याचे सोंडेंत पाणी मावत नव्हतें. सोंड मोठी फुगल्यामुळें पाणी नीट पडत होतें माथ्यावरील तांबडमाती वाहून आल्यामुळें सोंड लालभडक झाली होती. त्या लाल सोंडेवर सोनेरी उन्ह पडून ती आणखी लाल दिसत होती 'भैरवाचें' पाणी नेहमीं दुधासारखें स्वच्छ असावयाचें परंतु यदा अवकाळ्या पाऊस एकदम झाल्यामुळें भैरव लाल दिसूं लागला.

— र. वा. दिघे ( सराई )

### डोंगरातील प्रवाह

जेथें मेघ जाड येत नमत तेथें पर्वताच्या अंगाअंगावरून वाहणारे स्वच्छ पाण्याचे पाट दिसत. पर्वतांनीं शेंकडों जानवींच घातलीं आहेत कीं काय असें वाटे. त्या पुरात ऋषींनीं श्रावण महिन्यात श्रावणी केली होती कीं काय ?

— साने गुरुजी : ( श्याम )

## धबधब्याशीं खेळणारे पक्षी

प्रथम माझें लक्ष वेधलें 'राजा'च्या गंडस्थळावर लोंबणाऱ्या मोत्यांच्या सरांनीं आणि मग प्रलयकाळीं लोकांचें रक्षण करण्यास ज्याप्रमाणें शूर पाणबुडे उड्या घेतात, त्याप्रमाणें या धबधब्यांत चतुराईनें घुसणाऱ्या पक्ष्यांनीं. या पक्ष्यांना धबधब्यांच्या भीषण भव्यतेची कल्पनाच येत नसेल काय? किंवा ईश्वरानें त्यांच्या हृदयांत इतका धीर सांठविला असेल? मला वाटतें कीं आगंतुक पक्षी एवढें साहस करणार नाहींत. हे जोगवासी येथेंच जन्म पावले होते आणि धबधब्याच्या पडद्याच्या सुरक्षित जलावरणांत वाढले होते. सिंहाचे छावे सिंहिणीला भिणार नाहींत. समुद्रांतील माशांना लाटांची मौजच वाटते. त्याचप्रमाणें हे जोगपुत्र जोगशीं खेळत असावे!

— आचार्य कालेलकर : (जोगचा धबधबा)

## पावसाळ्यांतील शोभा

तळेगांवच्या पुढें गाडी सरकल्यापासून चहूं बाजूंनीं पाण्यानें तुडुंब भरलेलीं भातखाचरें आणि दूर दूर इमानी पहारेकऱ्यासारखे भर वृष्टींतहि स्थिर राहिलेले डोंगर दिसूं लागतात. घाटांत मोठमोठे पांणलोट गर्जना करीत कड्या-कड्यावरून फ़ोसळतांना दिसतात आणि कर्जतपासून कल्याणपर्यंतच्या तळ कोंकणांत सपाट भूमिभागावर गुडघाभर पाण्यांत बुडून वर डोकें करून वांकुल्या दाखविणारे भातांचे डोंगर व हर्षानें माना डोलावणारे उंच तालवृक्ष यांची शोभा फ़ारच सुंदर दिसते.

— ना. सी. फडके : (पाऊस)

## गुहेंतील जलधारा

माझें हृदय त्या धबधब्याच्या निनादाशीं एकतानता पावत होतें. इतक्यात उजवीकडील एका तटकल्या दरडीवरून पाण्याचे थेंब ओघळताना नजरेस पडले. जणू अत्यंत सौम्य आणि मूक जलतरंग किंवा वृंदगायन! हीच खरी सहस्रधारा. एकीकडून आम्ही वर चढलों. तेथें एक खोल गुहा होती. मध्यभागीं खांबासारखा एक दगड होता. त्याला आम्हीं प्रदक्षिणा घातली. सगळीकडे सहस्रधाराचा पाऊस पडत होता. तो सगळा पर्वत वितळतो कीं काय असें वाटत होतें. आम्हीं अगदीं भिजून गेलों. तासभर झपाट्यानें चालून आल्यामुळें शरीर गरम झालें होतें; त्यामुळें हा भिजण्याचा आनंद काहीं औरच वाटला. किती थंड होतें येथलें वातावरण!

— आचार्य कालेलकर (सहस्रधारा)

## कड्यानें अडविलेला पाऊस

श्रावणाच्या सरीवर सरी पडूं लागल्या. वाऱ्यानें डुलून डुलून भात मोठें होऊं लागलें. हिरवेगार भाताचे चोथे फुगले. जो ढग येई तो काळ्या कड्याला अडके व पावसाची जकात दिल्याशिवाय पुढें जाण्याचें नाकारी. सबंध दिवसभर पावसाची अंधेरी येई. टापटाप करून पाऊस रात्रंदिवस पडे. पानांवरून पावसाच्या सरी ताडताड आवाज करीत. रात्रीं ओढे, धबधबे धोंधों करीत.

— र. वा. दिघे : (सराई)

## काजव्यांतील धबधबे

आंब्याच्या फळावरून व झाडाच्या पानावरून काजवे इतके बसतात की, डोंगरावरून पाहणारास खाली हिरव्या उजेडाची पाणथळ झाली आहे असें वाटतें. त्याच्या उजेडानें दऱ्या चम्‌चम् करतात व पाणथळीतून हजारों बेडूक त्याना खाण्याकरिता उड्या मारतात. डोंगरावरून धबधबे आवाज करीत कोमळत राहतात.

— र. वा. दिघे : (पाणकळा)

## पावसाची जादू

गार वारा सुटून पाऊस खालीं उतरला म्हणजे भूमीला किती समाधान वाटतें म्हणून सांगूं ! वृक्षाची पानें एकदम टवटवीत होतात, मैदानावरची सुकलेली हिरवळ तेजस्वी दिसू लागते; भूभागावरची खेदाची व उदासपणाची धूळ दबली जाऊन तेथें ताजेपणा उत्पन्न होतो आणि दशदिशात एक प्रकारचें मांगल्य भरल्यासारखें वाटू लागतें.

— ना. सी. फडके : (पाऊस)

## सोन्याचा पाऊस

बाहेर बघा कसा सुंदर प्रकाश पडला आहे. पिवळा पिवळा प्रकाश ! असा नव्हता कधीं पाहिला. साऱ्या आकाशाला जणू सोन्याचा मुलामा दिला आहे. बाहेर अंगणात या. त्या भव्य देखावा. इतकाही ढग कोठें दिसत नाहीं. झाडें बघ कशी दिसत आहेत ! जणू सुवर्णाची वृष्टि होत आहे.

~ साने गुरुजी : (आस्तिक)

### सरोवराकाठचीं झाडें

जिकडे पहावें तिकडे मोठमोठीं झाडें. जणू काय सृष्टीनें आपलें सर्वच वैभव दाखविण्यासाठीं बाहेर काढलें असावें. वनश्री आणि जलदेवता याचें मीलन होतें तेव्हा तेथें लक्ष्मी ही न बोलावताच जावयाची. आम्ही तिसऱ्या प्रहरीं त्या सरोवराजवळ जाऊन पोहोंचलों. कितीतरी वेळपर्यंत त्या सरोवराच्या काठाकाठानें सहल केली. प्रत्येक कोपऱ्यातून सरोवराची शोभा वेगळीच दिसे. रूपगर्वित झाडें सरोवराच्या आरशात आपलें रूप न्याहाळीत होतीं.

— आचार्य कालेलकर : ( ब्रह्मदेशाचा प्रवास )

### सरोवराचें सौंदर्य

समोरच स्वच्छ व मधुरजलाचें सरोवर पसरलें होतें. त्याच्या भोंवतालीं हिरवीगार झाडी लागून राहिली होती. त्यापैकीं काहीं वृक्ष फुलांनीं तरारले होते, काहींवर फळेंहि दिसत होतीं, आणि काहींवर तऱ्हेतऱ्हेच्या लहानमोठ्या वेली पसरल्या होत्या. त्यातूनच अनेक रंगाचे व जातींचे पक्षी बसून आपल्या मदकर्कश आवाजानें किलबिल किलबिल करीत होते. काहीं आकाशात उंच भराऱ्या मारून खेळत होते. याशिवाय एकजुटीनें राहणाऱ्या पक्ष्यांचे थवे भिर्र भिर्र करीत चारा मिळविण्याकरिता चारी दिशाकडे जात होते.

— ना. ह. आपटे : ( रत्नगुफा )

दूरचा नदी-प्रवाह चांदीच्या प्रवाहासारखा दिसत होता. नदीला विश्रांति माहीतच नाहीं. सारखें वाहणें तिला माहीत. तिची प्रार्थना, कर्ममय प्रार्थना सारखी चोवीस तास सुरू असते.

— साने गुरुजी : ( श्यामची आई )

## तळ्यांतील आकाश

मधून मधून पाण्याचीं व्हानमोठीं तळीं लागत होतीं. तळ्यात रंगीबेरंगी ढगांनीं नटलेलें आकाश स्नान करण्यास उतरल्यामुळें पाण्याची खोली अनंतपटींनीं खोल भासत होती. कोठें कोठें चंचल कमलांमधून निःस्तब्ध बगळे उभे असलेले पाहून प्रभातवायूचें अभिनंदन करायची इच्छा होई.

— आचार्य कालेलकर : ( दक्षिण-गंगा गोदावरी )

## सरोवरावरील रंग

सरोवराचे कांठाकांठावरून पश्चिमेकडे पाहिलें असतां भिन्न भिन्न रंग पाण्यावर पसरलेले दृष्टीस पडतात. जणूं एकाद्या अद्‌भुत कादंबरींत नवरस गुंफलेले असावेत तसे ! पायाखालीं दाट शेवाळी रंग जणूं क्षणाक्षणाला आपणांस निमंत्रण देत असलेला भासतो. पण त्यांतहि सगळीकडे सारखेपणा नाहीं. कोठें मेंदीच्या पानाचा तर कोठें हिंगाच्या पानाचा हिरवा. अगदीं न्याहाळून पाहिलें तर वाटतें कीं, तो पाण्याचा रंग नसून पाण्यांत छपलेलें वेगळें विष आहे. जरा पुढें नजर फेंकली तर निराशेतून आशा प्रगट व्हावी तसा बदामी रंग दिसेल. पण त्या बदामी रंगांत धातूची चकाकी आहे. आणखी जरा पुढें, आणि तोच रंग थोड्या फरकानें नारिंगी बनून संध्येचें उपस्थान करीत असलेला दिसेल. ढगाची जांभळी छाया जर मध्यें पडली नसती तर इकडच्या नारिंगी आणि पलीकडच्या सोनेरी रंगामधील सौंदर्य किती खुलून दिसलें असतें !

— आचार्य कालेलकर : ( संध्यारंग

## ओढ्याचें गीत

प्रत्येक ओढ्याची निराळी गुणगुण, निराळा नाद ! एवढेंच न हे तर तोच ओढा सर्वत्र तीच भाषा बोलत नाहीं. आपला खोंड्यातल्या पऱ्या आहेना ? तो तिकडे मळीच्या शेताजवळ आला कीं निराळीच त्याची गुणगुण दगडावरून उड्या घेत येताना तो खो खो हसतो तर मग पुढें अगदीं गंभीर होतो जणू त्याची समाधि लागते मघाचा तो अवखळ, खो खो हसणारा, उड्या मारणारा, गडबड करणारा तोच का हा प्रवाह ? परतु मोठा ल्याड हो केळकराच्या सास्वाजवळ शांतपणा धारण करणारा हा प्रवाह पुढें ओकाच्या शेताजवळ गेला कीं गाणें म्हणू लागतो.

— साने गुरुजी (सुदर पत्रें)

## नदीचा पूर

ते पहा पाळणे वाहून येत आहेत ते रिकामे आहेत का त्यात कोणी आहे ? तीं पहा मुलें आहेत त्यातून. मुलें हसत आहेत. मातेच्या विशाल पाळण्यावर त्याचा छोटा पाळणा डोलत होता त्याच्या गरीब मातांना त्यांना आदुळायाला, जवळ घ्यायला वेळ नसे पद्मेनें तें काम उचललें. कोठें जाणार हे छोटे पाळणे ? पद्मा त्यांना आपल्या महान् पतीकडे घेऊन जाणार रत्नाकराला ती सागेल, 'तीं पहा अनाथ बाळें. त्याच्या पाळण्यावर राघू नाहींत, मैना नाहींत, हीं गरिबाचीं मुलें आहेत त्याच्या पाळण्यावर खेळणीं नाहींत. नाथ, मोत्याचे गेंद याच्या पाळण्यावर लावा. पोंवळ्याच्या वेलाचे दोर करा. सुदर सजवा हा याचा पाळणा.

— साने गुरुजी : (क्रांति)

## नर्मदेचा साज

आज नर्मदामाईच्या घरीं, कांहीं तरी मंगल दिनाचा उत्सव होता. तिच्या प्रवाहानें आज आपलें काळेंभोर, अथांग स्वरूप पार फेकून दिलें होतें. पश्चिमाभिमुखी नर्मदा पूर्वेच्या क्षितिजाच्या कांहींशा वर विलसणाऱ्या चंद्रबिंबा-पासून आज सोन्याचा साज घेऊन निघाली होती. आज तेथें नर्मदा नव्हतीच; पूर्ण चंद्रबिंबातून आज एक नवीनच सुवर्णगंगा उगम पावली होती. कुबेराच्या ऐश्वर्यानें लवथवत्या लाटांना आपल्या पदावर नाचवीत केवढ्या सलीलतेनें वळणें घेत घेत ती वाहात होती!

— कुसुमावती देशपांडे : (दीपदान)

## नदींतील दिव्यांची रांग

काजव्याच्या स्फुल्लिंगाएवढा आपला प्रकाश घेऊन एकेक दीप डोलत डोलत निघाला कीं आपल्या भोंवता-लच्या वीतभर लहरींना तरी व्यक्त स्वरूप देई, त्या अखंड निळ्या प्रवाहातून त्यांना उचलून धरी. त्याच दिव्याचें तें इवलेंसें प्रतिबिंब आपल्या परीनें नदीच्या अंतरंगात कितीं खोल खोल शिरायचा प्रयत्न करी. कित्येक दिवे पैलतीरावर जाऊन पोंचले होते, तिथें ते विसावून इतरांना आपली निःशब्द हाक देत होते. त्या लुटुपुटीच्या दीप-स्तंभामुळें नदीच्या विस्ताराची, तिच्या गांभीर्याची आज जणू नव्यानेंच जाणीव झाल्यासारखी वाटे. कित्येक दिवे त्या अखंड वाहत्या जीवनाचें क्षितिजापर्यंत संशोधन करायला जणू निघाले होते!

— कुसुमावती देशपांडे : (दीपदान)

## सागराची सृष्टि

समुद्र म्हणजे ठाव न लागणारें अपरंपार पाणी एवढेंच आपण समजतों. पण तें समजणें अल्प आणि एकांगी आहे. समुद्र म्हणजे पाण्याखालची विचित्र, अगण्य, अद्भुत अशी एक वेगळी सृष्टि आहे. पाणी हें तिचें जीवन आणि तेंच आवरण.

— महादेवशास्त्री जोशी : ( विजयदुर्ग

## समुद्राची गर्जना

समुद्राकडून येणाऱ्या थंड वाऱ्याची झुळुक लागताच त्याचें विचारांनीं तापलेलें डोकें शांत झालें. ते जसजसे समुद्राजवळ आले तसतसा हजारों माग चालत असलेल्या गिरणीसारखा आवाज त्यांना ऐकू आला. ती समुद्राची गर्जना होती.

— वि. स. खांडेकर . ( कांचनमृग

## तुफान वारा

मी एकटी एकटी बसून माझ्या आवडत्या खिडकींतून बाहेर पाहते, तेव्हा अनेकडे मधून मधून तुफान वारा वाहात असतो त्या तुफान वाऱ्यानें सारे सारीं झाडें पिंगा घालायला लागतात काळेकुट्ट ढग दाही दिशानीं जणू सैरावैरा धावून येत असतात आणि तें शांत शांत दिसणारं तळं ''त्याच्याहि अंत:करणांत खळबळ उडून साऱ्या शरीरभर लाटा उसळायला लागतात त्याच्या.

— विभावरी शिरूरकर : ( विरलेलं स्वप्न

### समुद्रकांठची सफर

समुद्रकांठचं एखादं खेडेगांव विश्रांतीला सर्वांत योग्य ठिकाण मी समजतों. अंथरुणांत लोळत पडण्याचा कंटाळा येईल तेव्हाच उठावं, लहर लागेल तेव्हां पोहण्यासाठीं समुद्रात शिरावं, डुबण्याचा कंटाळा आला कीं किनाऱ्यावरच्या मऊ मऊ रेतींत पडून जलपृष्ठावर नाचणाऱ्या मचव्यांची आणि आभाळाची अवीट शोभा पाहावी, तसं पडून राहण्याचा कंटाळा आला कीं पुन्हा पाण्यांत बुडी मारावी, किनाऱ्यालगतच्या नारळीच्या झाडांखालून हवं तेवढं भटकावं, सपाटून भूक लागेल तेव्हांच जेवावं आणि थकलेल्या शरीरानं झोपेची मागणी केल्यावरोवर शय्येवर अंग टाकावं अशा मिजासखोर, लहरी, स्वच्छंद दिनचर्येची मौज काय वर्णावी !

— ना. सी. फडके : ( घड्याळ )

### सागर-किनारीं

गोकर्णाची शोभा, त्याचें वैभव, त्याचें प्रमुख, सगळें कांहीं या सागराच्या सान्निध्यामुळेंच आहे. त्याचा तो उतरता किनारा भाग्यवंताच्या भालपट्टयासारखा वाटतो. त्याची तांबूस रंगाची स्वच्छ वाळू पायाखालीं दाबीत सारखें पुढें पुढें जावेंसें वाटतें. बैठक मारल्यावर पुढच्या भागाची 'धूळपाटी' बनविली कीं तिच्यावर कोणाकोणाचीं नामाक्षरें लिहावीं असा मधुर संभ्रम पडतो. एखादी टेंकडी पुढें घुमून तिनें किनारा तोडला कीं तिला कोसळून घालायचा लाटाचा भगीरथ प्रयत्न चालतो. तो मोठा प्रेक्षणीय वाटतो.

— महादेवशास्त्री जोशी : ( गोकर्ण-महाबळेश्वर )

## सागराची सोबत

आम्ही निघालों होतों तो करता मध्यान्ह होता. ग्रीष्म-ताप अंगातून घामाच्या धारा काढीत होता आणि खारा वारा लागोपाठ त्या पुसूनही टाकीत होता. तावूस रेतीच्या नागमोडी रस्त्यावरून आमची गाडी धोंगावत चाल्ली होती. कधीं उन्हातून तर कधीं छायेंतून. डाव्या हाताला हिरव्या झाडीचे साजरे डोंगर आणि उजव्या हाताला ल्हरत्या शुभ्र किनारीचा निळा दर्या, हे माझें चित्त द्विधा करीत होते. एखादी टेंकडी आडवी आली कीं गाडीला आरोह–अवरोह करावे लागत आणि तेवढ्यात समुद्र दृष्टी-आड होई. पण तेवढी जवनिका फिरली कीं पुन्हा तो डोळ्यासमोर पसरे. कधीं टेंकड्याच्या पोटात घुसणारा, कधीं उंच खडकाना ढुशा देणारा तर कधीं पुळणीवर लोळणारा. प्रत्येक वेळीं नवें रूप, नवा आविष्कार.

— महादेवशास्त्री जोशी : ( गोकर्ण महाबळेश्वर

## सौंदर्याचे सागर

एका वाळूच्या उंचवट्यावर चढताच आपण दोन सौंदर्य-सागराच्या सीमेवर उभ्या आहोंत असें त्या दोघींना वाटलें. उजव्या बाजूला हिरव्यागार भातशेतीनें भरलेला मळा डुलत होता, डाव्या बाजूला तेजस्वी सूर्यकिरणांनीं नटलेला समुद्र झुलत होता. वाऱ्याच्या झुळकेसरशीं एकीकडे भाताचीं रोपें झुळझुळत तर दुसरीकडे जळ ल्हरी सळसळत. भाताना फुट लागलेल्या लोंगराप्रमाणें लाटावरला फेस सूक्ष्म दृष्टीनें पाहणाऱ्या प्रेक्षकाला रमवू शकला असता.

— वि. स. खांडेकर : ( कांचनमृग )

## समुद्रावरील रंग

आमच्या उजव्या हाताला किल्ल्याच्या वरच्या भागीं सूर्याचे सुवर्णकिरण लाटांवर स्वार झाले होते. तिकडचा जलरंग सोनेरी बनला होता. किल्ल्याच्या खालच्या अंगाला सागरावर फिकट हिरवी वर्णछटा पसरली होती. त्या रंगाची सचेतन कांति डोळ्यांना भुरळ घालीत होती. तिकडील किनाऱ्यावरचे माड अन् सुरूचे वृक्ष यांच्या हिरव्या रंगाला त्यानें केव्हाच जिंकून टाकलें होतें. दक्षिणेत कोर्लाईचा किल्ला धीरोदात्तपणें उभा होता. त्याच्या मागच्या अंगाला रेवदंड्याची बादशाही हिरवी असूनहि दूरत्वामुळें निळसर दिसत होती. पाठीकडे अलीबाग शहर माडांच्या शेंड्यांची छत्रचामरें मिरवीत उभें होतें आणि उत्तरेस दूरवर समुद्राच्या कुशींत शिरलेल्या एका टेकडीच्या टोकावर बोटींना मार्गदर्शन करणारा दीपस्तंभ विराजत होता. आणि त्याच्या अलीकडे किनाऱ्याला लागूनच अलीबागची वेधशाळा माडाशीं उंचीची स्पर्धा करीत उभी होती.

— महादेवशास्त्री जोशी : ( अलीबागचा पाणकोट )

## समुद्रावरील चंद्रोदय

वद्यपक्षांतला मध्यरात्रीनंतरचा चंद्रोदय किती सुंदर असतो. निराशेनें ग्रासलेल्या मनुष्याच्या मनांत आशा जागृत व्हावी, तशी ती चंद्रकोर दिसते. समुद्रावर हें दृश्य नेहमींपेक्षांहि अधिक मोहक वाटतें असतें ! एकाद्या जादूगारानें, कात्यय, पाषाणानें, संगमरवरांत रूपांतर करावें, तशा समुद्राच्या लाटा दिसूं लागल्या होत्या.

— वि. स. खाण्डेकर : ( सुखाचा शोध )

समुद्रावरील लाली

सागराने आपला रंग बदलला. पूर्वेकडे जणूं काय लाल-जाभळ्या रंगाचा धबधबा कोसळत होता. आणि आश्चर्य हें कीं, पश्चिमेकडेदेखील याच रंगाचा पडसाद उमटला होता. मात्र पश्चिमेकडे आकाशानेंच हा रंग जास्त उचलला होता. पूर्वेची प्रसन्नता वाढूं लागली. लाल रंगात चमकेची भर पडली. कुंकुमाचा सिन्दूर बनला, आणि माझ्या मनात आलें, ' एक क्षणभर या लाटा थाबतील आणि जहाज स्थिर होईल तर किती छान होईल ! ' परंतु समुद्राच्या लाटा आणि माणसाचे मनोरथ कधीं थांबले आहेत ?

– आचार्य कालेलकर : ( ब्रह्मदेशचा प्रवास

समुद्रावरील चांदणें

जोत्स्ना समुद्राच्या उसळत्या लाटावर नाचत होती. गतकालाच्या स्मृति आणि भावि कालाच्या चिंता या जशा उत्कट आनंदाच्या उर्मींत विरून जाव्या, तसा क्षितिज आणि समुद्र याचा लय झाला होता त्या चांदण्यांत. भरतीच्या पैसाळ पाण्यानें अद्याप न बुडालेले उंच खडक चांदण्यानें उजळलेल्या आकाशातील ढगाच्या काळसर शकलासारखे दिसत होते.

– ग. त्र्यं. माडखोलकर : ( भंगलेलें देऊळ

समुद्राचा भयंकरपणा

दिव्याच्या किरणात समुद्र हजार फडा नाचविणाऱ्या नागासारखा भयंकर वाटला वल्हीं पाण्यातून बाहेर निघालीं कीं जो आवाज होई, तो ऐकून मृत्यु आपल्या जिभल्या चाटीत आहे, अशी कल्पना माझ्या मनात आली नि सारें अंग शहारलें.

रे. स. खाण्डेकर : ( हृदयाचा शोध

## वाळूचें नृत्य

वायुलहरींबरोबर वाळूचे कण नृत्य करीत होते. दुरून दिसणारा किनाऱ्यावरील फेस ताक घुसळल्यानंतर वर येणाऱ्या लोण्याप्रमाणें भासत होता. समोर पाण्याचें ब्रह्मांड पसरलें होतें. आईच्या प्रेमाप्रमाणें अगर कवीच्या कल्पनेप्रमाणें त्याचा कुणालाहि अंत लागणें शक्य नव्हतें. फार दिवसांनीं प्रिय मनुष्य भेटलें म्हणजे हृदयांत जशा आनंदलहरी उचंबळतात, त्याप्रमाणें समुद्रावरील विशाल लाटांचें दृश्य होतें.

— वि. स. खांडेकर ( कांचनमृग )

## वाळूचा खेळ

समुद्राच्या सहवासानें वाळवंटहि नाचरें झालें होतें, म्हणूनच कीं काय वाळूचे बारीक कण एकमेकांचा पाठलाग करीत हवेंत धांवत होते. सूर्यकिरणांनीं समुद्राचें पाणी तरवारीच्या धारेप्रमाणें लखलखत होतें. लाटांची क्रीडा पाहण्याचा मोह वारुणीला अनावर झाला आणि शिवमंदिराकडे न वळतां त्या दोघीहि पाण्यांत जाऊन उभ्या राहिल्या. पायाखालून झरझर नाहींशी होणारी वाळू, कड्यावरून उड्या टाकणाऱ्या लहान धबधब्याप्रमाणें दिसणाऱ्या लाटांच्या रांगा, लाटा किनाऱ्याकडे आल्या म्हणजे कुरळ्या केसांप्रमाणें चाललेली त्यांची क्रीडा, पोलक्याच्या झालरीप्रमाणें वाटणारा त्या लाटांवरील फेस, या साऱ्या गोष्टी किती वेळ पाहिल्या तरी नुकत्याच आपण पाहूं लागलों आहोंत असें वारुणीला वाटलें.

वि. स. खाण्डेकर : ( कांचनमृग )

## समुद्राच्या वाळूवरील खेळ

मऊ मऊ वाळूवरून धांवताना कुर्र कुर्र असा आवाज होई, पावलें वाजलीं कीं कुरल्या पुटकन् इवल्याशा बिळांत लपत, लाटा धांवत धांवत येत आणि पाणी उडवून सरकन् मागें जात, संध्याकाळीं आभाळांत रंगीत सिनेमा सुरू होई.

— वि. स. खाण्डेकर : ( मृगजळांतलें कमळ

## जलचरांचे खेळ

समुद्र आज मजवर प्रसन्न होता. आपल्या जामदारखान्यांतील कांहीं *अलौकिक चिजा त्यानें आज मला* दाखवायचें मनांत आणलें होतें. मध्येंच एकादा मासा डोकें पाण्यावर काढी, आपलें चांदीचें पोट लखखकन् दाखवी आणि झटक्यांत उलटा होऊन पुनश्च त्या उठावांत बुडी देई. माशाना वल्हवण्याचे पंख असतात हें मीं पाहिलें होतें, पण एका विशिष्ट जातीच्या मासोळ्यांना उडण्याचेहि पंख असतात, हें दृश्य मला नवीन होतें. भिंगुरटीसारख्या दोन मासोळ्या जोडीनें-पाण्यांतून वर उठल्या आणि जोडीनेंच पाच सहा हात उडत पुढें जाऊन पुन्हां जळात घुसल्या. दोन चार वेळां हा प्रकार मीं पाहिला. आणि मग ठरविलें कीं, यांना उडतां येत असलें तरी तें सरळ रेषेंत. आडवें-तिडवें उडण्याची कळ यांच्या पंखांत नाहीं. हरित-नील असें आणखी एका जातीचे मासे यव्या-थव्यांनीं हिंडतांना दिसत आणि बोटीचें तें अवाढव्य परचक्र अंगावर यायल्य म्हणून द्रुतगतीनें दूर पळत.

— महादेवशास्त्री जोशी : ( विजयदुर्ग )

### समुद्रावरील पक्षी

आगबोट खडकाळ भागांतून आंग चोरीत वाट काढीत होती, मधून मधून तरते दीपस्तंभ आणि कांहीं दगडांचीं डोकीं पाण्यावर दिसत होतीं. किरी नांवाचे बरेच पक्षी समुद्रांत तिथवर येऊन त्या दगडांवर गर्दी करून बसले होते. कबुतराच्या आकाराचा हा पक्षी वर्णानें शुभ्र खरा; पण त्याला अधिक आकर्षक करण्यासाठीं विधात्यानें त्याच्या पंखावर हळूच एक निळी कुंचली ओटली आहे. मानेवरचा तुराही तसाच शबल; पण तो मोराच्या तुऱ्याप्रमाणें उभा नसून मागच्या बाजूला झुकलेला दिसतो. हा समुद्रांत लांबवर जातो, कधीं सागरपृष्ठावर घिरट्या घालीत राहतो, तर कधीं लाटांवर अलगद तरंगतो. त्याच्या सगळ्या हालचाली ऐटबाज असतात आणि त्या मत्स्यवेधासाठीं चाललेल्या असतात.

— महादेवशास्त्री जोशी : ( विजयदुर्ग )

### उन्हांतला समुद्र

संध्याकाळीं चारचा सुमार असेल. आमची आगबोट निघाली. उन्ह सौम्य झालें होतें. मंद-मंद वारा वाहात होता. सूर्याच्या पाण्यावरील चांदीसारख्या चकाकीमध्यें पिवळेपणा येऊं लागला होता.

— आचार्य कालेलकर : ( महादेशाचा प्रवास )

*मनुष्यांत होणारा प्रत्येक बदल वाढीचा किंवा प्रगतीचा* निदर्शक असला पाहिजे.

— अनंत काणेकर

## लाटांची टक्कर

कित्येक लाटा तर त्या लांबलचक भिंतीशीं टक्कर खाऊन तिच्या डोक्यावर पाण्याच्या मोठमोठ्या सरी उडविण्यांतच मग्न असतात. लाट येऊन आदळते, भिंतीवर चढते आणि भिंतीच्या उंचीची पर्वा न करता निवून खालीं उडी घेते. त्या होळींतील पिचकाऱ्या दुरून आपल्याकडे धांवत येतात. तो अनुभव सर्वच प्रकारांनीं उन्मादक असतो. त्या सरींतून व त्या इंद्रधनुष्यांतून बाहेर फुटणारे व पसरणारे पाण्याचे तुषार सारें वातावरण गारीगार करून टाकतात. त्यांना असें वाटतें कीं, हा लाटाचा महोत्सव पाहाण्यासाठीं आलेल्यांचें स्वागत करण्याची जबाबदारी त्यांच्या माथीं पडली आहे.

— आचार्य कालेलकर : ( लाटांचें तांडव नृत्य )

## लाटांशीं खेळणारे सोबती

तट-प्रदक्षिणा करीत असतां मीं सहज एका बुरुजावरून बाहेरच्या अंगाला डोकावलें, तर माझ्या दृष्टीला वेधच लागला. तेथें कांहीं धारदार खडक पाण्यांत मांडले होते. त्यांचा रंग प्रवाळी होता. सागराच्या क्षुद्र लहरी त्यांच्या अंगावर वागडून मोत्यांचा चुरा पसरीत होत्या. त्यांच्या अंगाला जडलेलें शेवाळ तंतुमय होतें आणि त्याचा रंग अति हिरवा होता. लाटाच्या आघातांनीं तें शेवाळ हळुवारपणें डोलें; पण जागा मात्र सोडीत नसे. एकाद्या पालीसारखें तें खडकाच्या पाठीला घांस धेऊन बसलें होतें.

— पं. महादेवशास्त्री जोशी : ( विजयदुर्ग )

## समुद्रांतील किल्ला

आमचा रस्ता पुन्हा उजवा वळला आणि टेकडीच्या माथ्यावर गेला. आम्ही तिथें उभे झालों आणि समोर अनंत जलाचा विस्तार लहरतांना पाहिला. तिथेंच तो सावित्री नदीचा सागरसंगम आणि त्याच संगमावरच्या जळांत तो जंजिरा किल्ला. जणूं सरिता-सागराच्या प्रीतीचें एकमेव पुष्प ! लंब वर्तुळ आकाराचें एक सुंदर, रुबाबदार शिल्प. जणूं तें सागराच्या उदरांतच नागांनीं घडवलें आणि तसेंच वर उचलून सागरपृष्ठावर निळ्या आभाळ खालीं उभें केलें. समुद्राची प्रत्येक लाट त्याला धडक देते आणि मागें फिरतांना खदखदा हंसते. त्याच्याभोंवतीं सदासर्वदा धारोष्ण दुधावर दिसतो तशा समुद्रफेणाचें शुभ्र कांतिमान् वलय मांडलेलेंच आहे.

— महादेवशास्त्री जोशी : ( मुरुडचा जंजिरा )

## किल्ल्याची जोपासना

सकाळीं सूर्याचा पहिला किरण त्यालाच सोनेरी मुलामा द्यायला धावतो आणि सायंकाळीं शेवटचा किरण त्याचाच निरोप घेऊन ' पुनरागमनाय च' अदृश्य होतो. दिवसभर सूर्यानें तापवावें आणि रात्रीं चंद्रानें निजवावें असा क्रम त्याच्या जन्मापासून चालत आलेला आहे. झुंजतां झुंजतां त्याला झालेल्या लहानमोठ्या जखमांवर वारा अखंड फुंकर घालीत राहिला आहे. रात्रीं तारामंडळाचा चांदवा पसरून आकाशमाउली त्याला ' निज नीज माझ्या बाळा ' म्हणत राहिली आहे. जंजिरा एकट्या सागराचा पुत्र नाहीं; तर पंचमहाभूतांचा पुत्र आहे.

— महादेवशास्त्री जोशी : ( मुरुडचा जंजिरा )

## एकटें जहाज

सकाळीं सर्वांआधीं मी जागा झालों. त्यावेळीं अरुणोदय-देखील झाला नव्हता. आकाशात जसा चंद्र चालत असतो तसें आमचें जहाज एकटें एकटें पाणी कापीत चाललें होतें. काय ती त्या वेळची शान्ति! आगबोटीच्या अंतरातील यंत्ररूपी हृदय जर आपले ठोके ऐकवीत नसतें, तर बाहेरली शान्ति इतकी उठावदार झाली नसती. चोहोंकडे जणू काय लोखंडाचा किंवा शिशाचा थंड रस पसरला असावा असा दर्या दिसत होता.

— आचार्य कालेलकर (ब्रह्मदेशचा प्रवास)

## रात्रींचा जल-प्रवास

रात्रीच्या काळोखात पडावात बसून बोटीकडे जाण्यात मोठी गमत वाटते. पाण्यावर मधून मधून नाचणारे दिव्याचे किरण, एका तालावर पाण्यात पडणारीं वल्हीं, दूर उभ्या असलेल्या बोटींवरच्या दिव्यांचीं आरास— आपण ल्हान होऊन एकाद्या अद्‌भुतरम्य सृष्टींत फिरत आहों असा अशा वेळीं भास होतो.

— वि. स. खांडेकर : (सुखाचा शोध)

## नौकेचें नर्तन

होडी सुरू झाली. तिची हालचाल एकाद्या नर्तकी-प्रमाणें सुंदर होती. वल्ह्याच्या तालावर खळखळणाऱ्या जलतरंगाचे चाळ पायांत बांधून ती नृत्य करीत होती. एकाद्या वळणावरती चटकन् इतक्या नाजूकपणें वळे कीं तिच्यापेक्षा नर्तिकेची गिरकीसुद्धा कमी मनोहर वाटावी.

— वि. स. खांडेकर : (दोन ध्रुव)

## होडीचें वर्णन

आम्ही येत आहों हें दुरूनच पाहून तिथला निलाचा 'तारी' होडी घेऊन पुढें आलाच. काळ्या कपिलेसारखी त्याची ती चिमुकली एकसंध होडी आणि पंचपात्रीला शोभेशी पळी असावी तशी तिची 'नाजूकनार वल्ही. तो नावाडीही तसाच लहानसुरा. त्या पन्हळांत त्यानें आम्हां चौघांना एकदमच बसविलें. भोजनाची पंगत बसवतात तसें नव्हे, तर एकाच्या पाठीशीं दुसरा अशा पद्धतीनें.

— महादेवशास्त्री जोशी : ( विजयदुर्ग )

## लाटांची वेलबुट्टी

मी डेकच्या कठड्याजवळ जाऊन उभा राहिलों. जहाज जसजसें डोले तसतसें पाणी वर चढे आणि खालीं जाई. जिकडे पहावें तिकडे लाटा ! लाटा एकमेकींवर आदळल्या कीं त्यांच्यांतून फेस निघे. अंधारांत हा फेस चमकतो, आणि त्या चकाकीच्या वांकड्या-तिकड्या रेघा मिळून एक विचित्रच वेलबुट्टी दाखवितात.

— आचार्य कालेलकर : ( ब्रह्मदेशचा प्रवास )

## नदीचा मार्ग

शत्रुंजीचीं वळणें पाहावयाचीं असतील तर तिचें रक्षण करणाऱ्या त्याच नांवाच्या डोंगराच्या शिखरावरून पाहून घ्यावीं. सोन्यासारखें गवत उगवलेलें आहे, दूरवर गालिच्या-सारखीं शेतें पसरलीं आहेत आणि त्यांच्यामधून शत्रुंजी आपली वाट काढीत हळूहळू वाहात आहे.

— आचार्य कालेलकर : ( रेणुकेचा शाप )

## समुद्र व नदी

नदीचें पाणी शांत आग्रहानें समुद्राकडे वाहात असतें. इकडे आपली मर्यादा कधींच न सोडण्याविषयीं नांवाजलेल्या समुद्राचें पाणी चंद्राच्या चिथावणीनें घटकेंत नदीला वाट करून देतें, तर घटकेंत टक्कर देतें. नदी व सागर यांचा एकमेकाविरुद्ध सत्याग्रह चालत असताना अनेक प्रकारचीं दृश्यें पाहावयास मिळतात. समुद्राच्या लाटा नदीच्या पाण्याला तिरक्या कापीत जाऊं लागल्या म्हणजे पाण्याचा एक फवारा एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत धावत जातो. कांहीं कांहीं ठिकाणीं पाणी गोल गोल फिरून भोंवरे निर्माण करितें. सागराचा जोर वाढताच नदीचें पाणी मागें हटत जातें. दोन्ही बाजूच्या काठावर या फुगणाऱ्या पाण्याचा फार जोर असतो.

— आचार्य कालेलकर : ( सागर-सरिताचा संगम ).

## दुथडी वाहाणारी नदी

जिकडे तिकडे पाणीच पाणी. लाललाल नाचणारें भीषण पाणी. फेस उसळत आहे, लाटा नाचत आहेत. झाडेंमाडें मधूनच माशाप्रमाणें वर डोकीं काढून जात आहेत. जणूं नद्यांनीं हिरव्या पाचूचे दागिनेच घातले होते. हिऱ्याचीं हिरवीं कुडीं घातलीं होतीं. पाणी इतकें चढलें होतें कीं मोठमोठीं उंच झाडें तींहि बुडून गेलीं होतीं. जीं फारच उच झाडें, त्याचा कांहीं भाग बुडालेला नव्हता. तीं उच झाडें रक्तांबर नेसून तपश्चर्या करीत होतीं.

— साने गुरुजी : ( क्रांति ).

## गोदावरी नदीची शोभा

राजमहेंद्रीजवळ गोदावरीची शोभा कांहीं वेगळीच दिसत होती. या ठिकाणीं जें भव्य काव्य अनुभवास आलें, तें क्वचितच दुसऱ्या कोठल्याहि ठिकाणीं प्रकट झालेलें पाहिलें असेल ! पश्चिमेकडे दृष्टी फेंकली तों दूर-वर टेंकड्यांची एक सुंदर रांग दिसली. आकाश ढगांनीं झांकलें गेल्यामुळें कोठेंहि उन्ह पडलें नव्हतें. काळ्या मेघांमुळें गोदावरीच्या धूलिधूसर पाण्याचा काळेपणा अधिकच वाटला होता. मग भवभूतीचें स्मरण कां होणार नाहीं ? खालवरच्या या कालिम्यामुळें एकंदर दृश्यावर वैदिक प्रभातकालाची सौम्य सुंदरता पसरली होती आणि टेंकडीवर अवतरलेले कित्येक ढवळे ढग तर अगदीं ऋषी-प्रमाणेंच दिसत होते.

— आचार्य कालेलकर : ( दक्षिण-गंगा गोदावरी )

## आटलेल्या नदीचें खोरें

तें कालनदीचें खोरें दृष्टीला वेध लावूं लागलें. नदीचा प्रवाह आटला होता; पण पात्र दिसत होतें. पावसाळ्यांत डोंगरावरून खालीं धोधावणाऱ्या पाणलोटाचे चर त्या नदीला जिथें जिथें येऊन मिळाले आहेत, तिथें तिथें त्याच्या खोलगट खुणा दिसत होत्या. पात्राच्या दोन्ही अंगाचे जमिनीचे पट्टे काळसर वर्णानें चकाकत होते. कौलानीं शाकारलेल्या घराच्या छपरांत उजेडासाठीं म्हणून मध्यें हिरवी कांचेची कौलें बसवावीं, तसे त्या कृष्ण भूभागावर मधूनमधून हिरवे ठिपके शोभत होते.

— महादेवशास्त्री जोशी : ( शिवछत्रपतींची राजधानी

## झऱ्याचे सूर

त्याची बासरी कंप काढूं लागली. त्याचे बासरींतून प्रेमानें झंकारलेले नाद निघू लागले. शेजारून सराईच्या स्वच्छ पाण्यानें निवळलेला झरा खळ खळ करून क्लॅरिऑनेटच्या गळ्यात गळा घालून त्याला केव्हा साथ करूं लागला हें त्याला कळलेंसुद्धा नाहीं.

— र. वा. दिघे : ( सराई )

## झऱ्याचें संगीत

झुळझुळ पाणी वाहू लागलें. एकाद्या गायकानें आपल्या कंठातून बाहेर पडणाऱ्या मधुर स्वरात गुग होऊन जावें, त्याप्रमाणें त्या झुळुझुळु आवाजानें पर्वतराजाची समाधि लागली.

— वि. स. खाण्डेकर : ( जळलेला मोहर )

## हिरवीं कुरणें

संध्याकाळचे फाटलेल्या ढगातून सरळ निघालेले सूर्य-किरण खलाटीवर पडले होते. त्या पिवळसर उन्हानें भात-शेती उजाळली. हिरवीं कुरणें शोभायमान झालीं. त्यातून चरणाऱ्या गुराचे रंग लावून स्पष्ट दिसूं लागले. समोर एक डोंगर खाल्तरपर्यंत हिरवट झाला होता. त्याचे रंग उन्हात गहिरे दिसत होते. त्याचें माथ्यावरच्या मैदानात व कड्याच्या अंगानीं हिरव्या गवतात सोनटक्याच्या पिवळ्या फुलाचा समुद्र उसळला होता. आडवें उन्ह झाडाच्या पानापानातून रानाच्या अंतरंगात शिरलें. रानें हिरव्या प्रभेनें खुललीं.

— र. वा. दिघे : ( सराई )

### सृष्टीचा नित्यक्रम

सृष्टिदेवीनें मात्र आपली कामगिरी दरसालप्रमाणें बजावली होती. भाताचा रंग दरसालप्रमाणें पिवळा होता. कुरडूचीं फुलें दरसालप्रमाणें होतीं. फुलपांखरें दरसालप्रमाणें भाताच्या सुवासाच्या दरवळीनं उडत होतीं. होले, पारवे सराईच्या शांततेत घुमत होते. मोर ओरडत होते. बुलबुल, काळे पक्षी गात होते. चास तळपत होते. सराईचें निळें आकाश डोंगरावर वितळत होतें.

— र. वा. दिघे : ( सराई ).

### पावसानें वाढविलेल्या वनस्पती

पश्चिम घाटांतील पावसाचे चमत्कार सुरू झाले. पायथ्यापासून डोंगर-माथ्यापर्यंत हिरवा समुद्र पसरला. घरांच्या, देवळाच्या भिताडांवरून वनस्पति उगवली. आठ महिने झोपलेली शेवाळ झाडांच्या शेंड्यावरून देखील जागी झाली. जिकडे पहाल तिकडे हिरवेंगार! रान-सईच्या आसपास असा एकहि रंग शिल्लक राहिला नाहीं, कीं तो डोळ्यांना खुपला असता.

— र. वा. दिघे : ( सराई ).

### धीट गवत

सर्वजण मोठमोठ्या इमारतींत आपआपल्या कामांत दंग झालेले असल्यामुळें सारे रस्ते खुले होतात. मानवी श्वासाचा संपर्कहि नसलेला पावसाळी वारा अनिर्बंधपणें वागूं लागतो. नुकतेंच वर मान करणारें कोंवळें गवत आपलें पंख फडफडूं लागतें, त्या सौम्य उन्हानें जणूं धीट होऊन इकडे तिकडे पाहूं लागतें, हसूं लागतें. येऊन गेलेल्या सरीच्या थेंबांनीं झाडें-पानें चमकूं लागतात.

— कुसुमावती देशपांडे : ( मध्यान्ह ).

## शारदीय शोभा

सृष्टीचा शारदीय उत्सव सुरू झाला. आकाशाच्या निळ्या रंगाला विलक्षण शोभा चढली. चादण्या रात्री विलक्षण मनोहर वाटू लागल्या. पक्ष्याचा स्वैर विहार पुनः सुरू होऊन त्याचे स्वच्छंदी हर्षस्वर ऐकू येऊ लागले, आणि तिळाच्या व झेंडूच्या फुलाचे गडद पिवळे आणि तांबूस रंग इतस्तत पसरलेले दिसू लागले. मग हलकेहलके सूर्याची दिशा बदलली, वाऱ्यात गारवा येऊ लागला. रानात बुसळी गवत जिकडे तिकडे माजले हरीनला गारठा हुडहुडू वाटला.

— ना. सी. फडके. (प्रवासी)

## वसन्ताचें वैभव

वसंत ऋतु आला तसा गेला. ग्रीष्म ऋतूत रात्री लहान होऊन दिवस मोठे झाले, वाऱ्याची दिशा बदलली, जलाशयातील पाणी आटून गेलं, आणि प्रखर सूर्यतापान जमिनीला भेगा पडल्या पुढें आभाळात हल्के हल्के ढग जमू लागले, वादळी वाऱ्याना सुरुवात झाली आणि विद्युल्लतेचा कडकडाट होऊन वर्षाकालास प्रारंभ झाला. रानोमाळ गवत माजलें, शेतें उंच उंच वाढली, लहानमोठीं झाडं पल्लव भारान आच्छादित झालीं, मृदु आणि उग्र वासानीं दाही दिशा दरवळून गेल्या, तारड्या गलिच्छ पाण्यान नदी-नाले खळखळले, आणि पखात चोंची खुपसून कुडकुडणारे पक्षी 'पावा रे पावा आता ही वृष्टि !' अशी वरुण राजाला प्रार्थना करण्यासाठीं चिवचिवाट करू लागले.

—ना सी. फडके: (प्रवासी)

## वसंताचें स्वागत

आपल्या लाडक्या वसंताच्या पायाला खडे बोचूं नयेत, म्हणून सृष्टीनें जिकडे तिकडे गवताचे गालिचे पसरलेले होते. तो झाडाच्या फांद्यावरून नाचूं लागला, तर त्याचें कोमल अंग खरचटेल, या भीतीनें तिनें सर्व वृक्षांच्या फांद्या नवपल्लवांनीं आधींच झांकून टाकल्या होत्या.

– वि. स. खांडेकर : ( कांचनमृग )

## शिशिराची शोभा

शिशिर ऋतूचे अखेरचे दिवस होते ते. रात्री मोठ्या होत्या. दिवस उदास वाटत होते. कधीं कधीं कडक थंडी पडे. रात्रीं वाहणारा वारा गारठ्यात भरलेला असे आणि दुपारच्या वेळीं कुठें तरी जोराची वावटळ उठे. ती धूळ, पाचोळा, चिंध्या काय सापडेल तें गोळा करून चक्राकार फिरून आकाशात थोडीशी उंच भरारी घेई आणि पुढें जाई! गांवाच्या आसपास कुठें कुठें उभ्या असलेल्या पिकांवरहि पिंवळा रंगच बहुतांशीं पसरलेला दिसे आणि हरभऱ्याचीं टेंगणीं झुडपंच काय तीं आपला काळसर हिरवट रंग डोळ्यांत दाखवीत. गांवातल्या आणि आसमंतातल्या मोठमोठ्या झाडांच्या फांद्या पर्णहीन दिसत आणि आपल्या देहावरून गळलेलीं जुनीं शुष्क पानें वाऱ्याच्या लोटाबरोबर धुळींत मिसळून इकडे तिकडे उडालेलीं पाहण्याच्या दुःखानें ते वृक्ष अधिकच उदास झाल्यासारखे वाटत.

- ना. सी. फडके : ( प्रवासी

## हिंवाळ्यांतील दुपार

हिंवाळ्यांतली दुपार तरी काय कमी मनोरम असते? त्या वेळच्या ऊबदार हवेची गोडी अस्सल सुखवाचांना देखील पटेल. तिचा आस्वाद घेत उन्हांत पटलें असतांना डोळ्यांना चारी बाजूंना जणूं समृद्धीची ऊब दिसूं लागते. हेमन्ताचें सोनें सगळीकडे पसरलेलें असतें. गव्हावर सोनेरी तांबूसपणा चढायला सुरुवात होते. कडूनिंबाच्या पानांचें सोनें होऊन तीं गरागरा शिवाशिवी खेळत हिंडूं लागतात. जसजशी शिशिराची कळा ओसरूं लागते, तसतशा भिंगऱ्यांच्या झाडांवर निव्वळ सोनेरी शेंगाच शेंगा लटकूं लागतात, तर पिवळ्या कांचनाचें झाड एकेका फांदीवर एकाद-दुसरेंच सुवर्णमय फूल घेऊन डोलूं लागतें.

— कुसुमावती देशपाण्डे : ( म

## फुलवंतीची जादू

पळसांना, पांगाऱ्याना व सावरींना तांबडीं फुलें इतकीं आलीं होतीं कीं त्यामुळें रान पेटल्यासारखें दिसत होतें. झाडांना धुरकट पालवी आली होती. नव्या नवाळीचें राज्य सुरू झालें होतें. भिल्लाच्या गवताच्या व कॅवळीच्या झोंपड्या रानांचे फटींतून लांब टोंगरांचे उतरणीवर किंवा टेंकड्यांचे माथ्यावर दिसत होत्या; त्यांचेसमोर उंच झाडांच्या गर्द सावलींत भिल्लाचीं पोरें बागडत होतीं व ओरडत होतीं. मोहाला फुलें आलीं होतीं. मोहाचे झाडाखालीं आलें कीं, त्याचा मादक वास सायलीचें वासाला मारून टाकी.

— र. वा. दिघे : ( पाणकळा )

## फुलांचे ताटवे

अंधुक चंद्र-प्रकाशांतहि त्या गोंडस टेंकडयांच्या उतारावर गवताचा हिरवा रंग व 'हेदर'च्या रानफुलांचा जांभळा-निळा रंग लपंडाव खेळतांना दिसत. मधूनच नदीचं एकादं वळण चमकून जाई. बागेंत अतिशय नाजूक मोतिया रंगाच्या व मधुर सुवासाच्या फुलांचे ताटवे बहरलेले असत. त्या ठिकाणीं पहिले किती तरी दिवस वाटे कीं व्हानपणीं ऐकल्या-वाचलेल्या अद्भुतरम्य कथांतील एकाद्या उद्यानांत तर आपण येऊन पडलों नाहीं !

— कुसुमावती देशपाण्डे : ( मध्यरात्र )

## पिवळीं पानें

विशेषतः हिंवाळ्याच्या शेवटीं व वसंताच्या पूर्वी या रस्त्यावर फारच शोभा दिसते. पिवळीं, लाल, किरमिजी, भुरकट वडाचीं पानें जाणाऱ्यायेणाऱ्यांवर जणूं अभिषेकच करीत असतात. टप, टप, टप; अगदीं हलुवारपणें गंमतीनें खालीं येणारे हे देवदूत तर नसतील ! त्या पिवळ्या-पिवळ्या पानांवरून चालत असतांना वाटतें कीं, आपण सोन्याच्या चुऱ्यावरून चालत आहोंत किंवा सोनेरी फुलांवरून चाललों आहोंत.

— वि. पां. दांडेकर : ( काल खेळतो आहे. )

## फुलांचे सुवास

संध्याकाळच्या सांवल्या रानाडोंगरावरून काळोख करूं लागल्या. डोंगरमाथ्यावरचे कारवीचे मस्त मधु पराग सुवासाच्या डोंबाप्रमाणें उठले.

— र. वा दिघे : ( सराई )

### कमळांचें तळें

निळसर पाण्यावर हळूहळू मिटू लागलेलीं कमळें दुरून तारकांप्रमाणें दिसत होतीं. मधून मधून पाण्यावर एखादा लहान तरंग उठे आणि एखाद्या कमळाभोंवतीं नाचे. जणू काहीं तो त्या कळीला लाडकेपणानें म्हणत होता, ' कमळाताई, काय ग झाल इतक रागवायला? हा घे माझा पापा ! ' तळ्याच्या तीन बाजूंना तीन टेंकड्या होत्या. त्याच्या मध्यभागीं हिरव्या कोंदणातल्या निळाच्या खड्याप्रमाणें तें तळें चमकत होतें.

— वि. स. खांडेकर : ( दोन ध्रुव )

### गुलाबाचें फूल

सकाळीं उठून खोलीचें दार उघडलें कीं एका ना एका झाडावर गुलाबाचें सुंदर फूल उमललेलें दिसे. पूर्वेकडल्या अरुणोदयाचें सर्व सौंदर्य जणू काहीं त्या चिमुकल्या पुष्पाच्या हंसऱ्या पाकळ्यांत साठविलेलें आहे असा मला भास होई.

— वि. स. खांडेकर : ( जळलेला मोहर )

### गवताचें पातें

अगदीं साधारण गवत होतें तें. त्याचें एकेक पातें वीतभर लांब वाढलेलें एखाद्या पावसाच्या सरीनें तें चकाकत नव्हतें. दवबिंदूंनीं त्यावर मुकुट चढवला नव्हता. सरळ, साधें, लवून गेलेलें एकेक पातें ! वाऱ्याची झुळूक येई, सर्व पातीं बरोबर वाकून एक निःशब्द लय आळवीत, पुन: पूर्ववत् कसलीं तरी वाट पाहात उभीं रहात.

— कुसुमावती देशपांडे : ( गवताचें पातें )

### उन्हांत चमकणारा मोहोर

कडूलिंबाच्या फुलांचे हिरवे-पांटरे तुरे, आंब्याचा तांबूस-पिवळा मोहोर आणि चिचव्याच्या झाडाचीं पांढरीं-पिवळीं फुलें, यांच्या रंगांच्या निरनिराळ्या नाजूक छटा त्या सौम्य उन्हांत मोठ्या मजेदार दिसत होत्या. त्यांच्या संमिश्र मादक गंधानें हवा दरवळून गेली होती व त्या हवेला कंपित करणारा कोकिळाचा भेदक सूर मधून-मधून कानांवर पडत होता.

— ग. त्र्यं. माडखोलकर : ( नवे संसार )

### उन्हांतलें सूर्यफूल

वेलीला दूरवर खड्या असलेल्या सूर्यफुलाचें स्मरण झालें. तिनें सळसळून खुणावलें. पण बिचारें सूर्यफूल पाहूं शकत नव्हतें ! काय व्रत वांट्याला आलें होतें वेड्याच्या ! एकटें उन्हांत उभें रहायचें !— डोईवर घागर घेतलेल्यासारखें. अन् सूर्याची स्वारी हालेल तसें तोंड वेंगाडून पाहात रहायचें ! सूर्याला कधींहि दया येत नव्हती. त्याच्या धाकानें वाटींत बदल होत नव्हता नि फुलांतहि वाढ होत नव्हती. अनेक बारक्या फुलांनीं भरलेलें नुसतें एक रंगीत तबक.

— अरविंद गोखले : ( माहेर )

खोलीच्या बाहेर येऊन मीं पाहिलें. कुणालाही ओळखूं येऊ नये म्हणून रजनीनें कृष्णवस्त्र अंगाभोंवतीं लपेटून घेतलें होतें. मात्र इतकी दक्षता घेऊनही क्षणोक्षणीं पृथ्वीकडे पाहून आपले हजारो डोळे मिचकावण्याचा मोह तिला अनावर होत होता.

## रंग व गंध

कारवीच्या सुवासातून आता आणखी निरनिराळे सुवास येऊ लागले. आव्याच्या महरण्याने कहर केला. त्याचे मागून पणशीच्या फुयन्याचा वास आणि त्यामागून उंबर याचे राकट सुवास, मधून मधून सायलीचा नाजूक दरवळ निघे. कुडा, करवद व इतर जंगली झाडें यानीं पण वसत-पचमी सुरू केली ! शहाजहान बादशहाच्या बागेंत असले सुगंध सुटले नसतील !

— र. वा. दिघे . (सराई)

## सुगंधाचें साम्राज्य

पुसात आव्याच्या आम्राळीला मोहराच्या टिऱ्या दिसू लागल्या म्हणजे सजलपुरात सृष्टिदेवीनें सुगंधाचें फर्मान काढलें आहे असें वाटतें चौफेर सत्रींमुमरींचे वाग फुट्ट लागतात. स्वच्छ निळ्या आकाशाच्या पार्श्वभूमीवर डाळिंबीचीं फुलें डुल्तात रानावनात आजूबाजूला झाडाना बहर येतो. मळ्या मळ्यातून तळ्या-तळ्याच्या बाजूनें सुगंध दरवळून राहतो. जिकडे तिकडे फुलाचा घमघमाट सुटतो व सजलपुरावर परिमलाचें वातावरण बसून राहतें जो श्वास घ्याल तो गंधयुक्त फुलाच्या सुवासानें जीव वेटावून जातो.

— र. वा. दिघे : ( पाणकळा )

## कळीचें सौंदर्य

उप कालीं फुट्ट पाहणारी कळी किती पवित्र दिसते ! ती हळूच हसते व आपल्या अतरगातील सौंदर्य व सौरम्य विनयानें वरमान करून त्या सूर्यनारायणाला अर्पण करते.

— साने गुरुजी : ( क्रांति

### देवाचा बगीचा

सुंठ आणि बाबू माठ वर्षांनी फुलते, तर कारव सात वर्षांनी फुलते. यदा कारवीला बहर आला होता. कारव नुकतीच फुलू लागली होती. गुलाब, चपक, बकुल, जाईजुई, चमेली, राजाची बाग दरवळून टाकतील. कवींनी त्याची स्तुति गाइली आहे पण गरीब बिचारी कारव देवाजीचा बगीचा दणाणून टाकीत होती.

— र. वा. दिघे : ( सराई )

### फुलाचें सौंदर्य

कारवीच्या मधुर सुवासातून त्याला झेंडूचा तिखट वास आला. कुणाचे कडेनें मलमलीचे गोंडे लागून राहिले होते. तान्याच्या उजेडात झेंडूचे गेंद गर्दी करून उभे राहिलेले त्याला दिसले.

— र. वा. दिघे : ( सराई )

### बहरलेला पारिजात

सकस जमीन व चांगलें खतपाणी मिळाल्यें म्हणून पारिजातक चांगल्या फोफावला होता. त्याला बहर आला होता. तो शततारकेच्या नक्षत्रपुंजाप्रमाणें डवरला होता.

— र. वा. दिघे : ( पाणकळा )

### फुललेली कळी

एके दिवशीं सकाळीं ती कळी फुलली ! भीत भीत तें फूल सृष्टिकडे बघत होतें; सूर्याकडे बघत होतें, विनयानें अर्धस्मित करीत होतें. थोडी मान वर, थोडी खालीं, थोडें मिटलेलें, थोडें उघडलेलें ! किती गोड गोड फूल !

— साने गुरुजी : ( घड्याळाच्या मर्ले )

## प्रातःकाळची झुळूक

दिशा लवकरच उजळतील असें दिसत होतें. प्रातःकाळची गार वाऱ्याची झुळूक नवविचाराप्रमाणें पुनर्जीवन देण्याकरिता त्यात शिरत होती.

— वि. स. खाण्डेकर : ( काचनमृ

## वाऱ्याची झुळूक

मावळत्या सूर्याच्या नाजूक छटानीं हें समोरच सगळ पाणी रंगून गेलं आहे. त्यावरून वाऱ्याची एकेक झुळूक किती हलुवारपणें तरंगत जाते! भोंवतालच्या बंधाऱ्यात अडकून पडलेलं, शेवाळानें त्रस्त झालेलं उदास पाणीदेखील तिच्या स्पर्शानें उचंबळून येतं, त्याच्यावर रोमांच उभे राहतात. ती एकेक झुळूक काय सांगते त्याला? स्वातंत्र्याचा संदेश देते? आपलीच अंतःशक्ति साठवून बंधाऱ्याच्या पलीकडे उडी घ्यायचा कानमंत्र देते?

— कुसमावती देशपांडे : ( अप्सराची भे

## गार झुळूक

चन्द्र आकाशात मध्यावर तळपत होता आणि त्याच्या प्रभेनें सारी सृष्टि उजळून गेली होती वारा बहुतेक नव्हताच. पण लहान मुलानें झोपेंत टाकलेल्या उच्छ्वासासारखी त्याची मधूनच जी एखादी झुळूक येई, ती चन्द्रकिरणात न्हाऊन आल्यामुळेंच कीं काय, गार गार वाटे. माळावरलीं निश्चेष्ट असलेलीं झाडें त्या झुळुकेमुळें थोडीशीं हालचाल करीत आणि मग असें वाटे कीं, सुषमेनें धुंद झालेल्या सृष्टीची अद्याप काहीं पुरती शुद्ध हरपलेली नाहीं.

— ग. त्र्यं. माडखोलकर : ( नवे संसा

## झाडांतील झुळूक

रानांत जिकडे पाहावें तिकडे झाडेंझुडपें होतीं. गाण्याची तान ऐकताच डुल्णाऱ्या रसिकाप्रमाणें वाऱ्याची झुळूक येताच या झाडांचीं पानें हलत. जणू काय रसिक वृक्ष टाळ्या वाजवून वायूच्या गायनाचें अभिनंदन करीत होते. एका देशाच्या निशाणाखालीं गोळा झालेल्या अठरा-पगड जातींप्रमाणें निरनिराळीं झाडें त्या वनभागांत खांद्याला खांदा लावून उभीं होतीं. मधूनच दिसणाऱ्या एकाद्या आम्यावर हिरवे घोस लटकलेले पाहून एकत्र खेळणाऱ्या बाळराच्या जमावाची वुणालाहि आठवण झाली असती.

— वि. स. खांडेकर. ( कांचनमृग )

## वनस्पतींचें राज्य

हिरव्या पान-पाचोळ्यातून सोनें काढणारा किमयागार पश्चिमेकडील डोंगरावर कष्ट लागला जिकडे तिकडे वनस्पतींचा समुद्रच झाला होता. रानें, झाडच्या, माळ, धरी, पट्ट्या, कातमेरा गवतानें, पानानीं नाहीं तर वेलींनीं गजबजल्या होत्या. कोठेंहि तसूभर जागा वनस्पतीनें मोकळी ठेविली नव्हती. ही हिरवी वनस्पति कांहीं ठिकाणीं पिवळी तर कांहीं ठिकाणीं लाल पडली होती. झाडांचीं पानें झडण्याच्या बेतांत होतीं गवताचें वीं गळत होतें. शेतकरी भात कापीत होते. या दरींत अन्नरसाच्या निर्मितीकरितां विश्वकर्मा जणू एक मोठा यज्ञ करीत आहे असें दिसत होतें.

—र. वा. दिघे : ( सराई )

## गवताचा गालिचा

आपल्या पाठीमागें पसरलेल्या मैदानाकडे ते पाहू लागले. तो काळसर हिरवा गालिचा पसरत क्षितिजाच्या रेषेंत विलीन झाला होता ते त्याच्याकडे निरखून पाहू लागले. मदशी वाऱ्याची झुळूक येई. नुकत्याच मावळणाऱ्या चंद्रकोरीच्या प्रकाशात तो सबंध गालिचा जणू पुढें क्षितिजाकडे सरकण्याचा प्रयत्न करीत आहे, असें दिसे. ल्हान ल्हान तृणांकुरावरून एकेक लाट सरकन दिसेनाशी होई.

कुसुमावती देशपांडे . ( गवतानें पातें )

## हिवाळ्यातलि पानें

आम्ही गेलों ते माघातले पानगळीचे दिवस होते. शिशिरानें त्या कामावर वाऱ्याची सक्त नेमणूक केली होती. तो झाडाचीं पिवळीं पानें प्रथम मुळात झडवीत होता आणि तेथून मग रानभर इतस्तत लोटीत होता. मात्र वाऱ्यानें एवढी लुटमार करूनही झाडें मात्र अगदींच कफल्लक झाली नव्हतीं काहींची जुनी पर्णसंपदा अजून थोडीबहुत टिकून राहिली होती, तर काहीं वृक्षाच्या अंगावर नव्या आरक्त लुसलुशीत पालवीचा साजही चढला होता.

— महादेवशास्त्री जोशी ( शिवछत्रपतींची राजधानी )

पावसानें जिकडे तिकडे हिरवेंचार करून सोडलें होतें. श्रावणाच्या सरी मधून मधून पडत होत्या. नाचणीच्या हिंगुरानें माळरानें काळीशार दिसत होतीं. शेतें वाऱ्यात डुलत होतीं. हिरव्या शोभेवर सध्याकाळचें पिवळें ऊन पडलें की, भूवर स्वर्ग उतरला आहे असें वाटे.

— र. वा. दिघे : ( पाणकळा )

### झाडावरचा पक्षी

एक बाहिरी पक्षी आपला चिमुकला पिसारा उभारून आंब्याच्या फांदीवर थुईथुई नाचत होता. त्यानें सप्तसुराच्या रागदारींत गिरकीचा आलाप घेतला व पाते लवतें न लवतें तों सुरेदिशीं हवेंत फिरकीचें रगण मारलें व तो पुन्हा आपल्या जागेवर येऊन नाच करीत आलाप घेत डौलानें नाचू लागला.

– र. चा. दिघे : (सराई)

### आंब्यावरील कोकिळा

दूर कोठें तरी आंब्याच्या झाडावर बसून कोकिळा त्याच्याशीं लपटाव खेळत होती. आकाश व पृथ्वी या दोघांमध्यें यावेळीं आपलें सौंदर्य प्रगट करण्याची जणू काय अहमहमिकाच लागली होती

– वि. स. खाण्डेकर : (कांचनमृग)

### पाखराचा थवा

चालता चालता डावीकडून सागरी पाखराचा एक थवा आवाज न करता आमच्यापुढें आला, क्षणभर खालींवर असा नाचला आणि एखाद्या रागिणीच्या स्वरमालेच्या आरोहावरोहाप्रमाणे 'उड्डीन' गतीनें उजव्या हाताच्या अंतराळात भरारला. किती शिस्त होती त्याच्या त्या संघात! एकहि पाखरू घोटाळलें नाहीं कीं चुकलें नाहीं. वाटलें कीं, त्या चाळीसपन्नास शेंकडों पक्षिशरीरात एकच प्राण खेळतो आहे.

[illegible] (अर्ध [illegible])

### पहाटेचें वातावरण

मीं अंगावरचें पांघरूण फेंकून दिलें. उठलों व चूळ भरायासाठीं खिडकींत गेलों. गार वाऱ्याची झुळूक अंगावरून गेली. बाहेर स्फटिकासारखें शुभ्र चांदणें पडलेलें दिसलें. कॉलेजच्या आवारांतील वेलींवरील अर्धविकसित फुलाचा मधुर वास आला. समोरच्या पिंपळावरील पक्षाची किलबिल ऐकूं आली. लांब कोठें तरी एका झोंपडयांत कोणी स्त्री गाणें म्हणून दळत होती. तिच्या गाण्याचा अस्पष्ट आवाज कानावर आला.

— ना सी. फडके ( कुलाब्याची दांडी )

### उपःकालाची रम्यता

सिंदूरामधून सुवर्णाचा जन्म झाला. पश्चिम किनाऱ्यावरील सूर्यास्ताची शोभा आपण अनेक वेळा पाहूं शकतों, परन्तु सागर-मंथनामधून लक्ष्मी निघावी तशी उदीयमान उषेची वर्धमान शोभा पाहाण्याचा आनंद कांहीं औरच असतो. आकाश जसजसें हसूं लागलें, तसतशी समुद्राच्या मुखावर आनंदलज्जेमुळें फुगलेल्या शिराची सल्या वाढूं लागली. जणूं काय दोन समवयस्क मित्रांत थट्टा-विनोदच चालू असावा.

— आचार्य कालेलकर ( नवदेशाचा प्रवास )

पहाटेचें निर्मळ चांदणें सगळीकडे पडलें होतें. निळ्या टोपीवर शोभणाऱ्या चमक्यांप्रमाणें स्वच्छ आकाशावर चांदण्या चमकत होत्या.

— ना. ह. आपटे : ( रत्नगुंफा

## पहांटेची सृष्टि

शेताच्या वक्षःस्थळावर चंद्रिकेचें क्षौम वस्त्र पसरलें होतें. तो शीतल अमृतमय प्रकाशरस झाडेंमाडें मूकपणें प्राशीत राहिलीं होतीं. पश्चिमाकाशात कृत्तिका क्षितिजाखालच्या अथांग सागरांत सूर मारावी न मारावी अशा संदिग्ध मनःस्थितींत दिसत होत्या. चंद्राला मात्र विशेषशी घाई दिसली नाहीं. तो रोहिणीशीं विरहापूर्वीच्या गुजगोष्टी विश्रब्धपणें बोलत राहिला होता. सभोंवतींच्या डोंगरांना आकाशमाउली दंवबिंदूंनीं कार्तिकस्नान घालीत होती. ताजी, टवटवीत, प्राणमय, प्रकाशमय अशी ती पहांट होती.

– महादेवशास्त्री जोशी : ( परशुराम क्षेत्र )

## पहांटेची मोहिनी

पहांटेच्या त्या प्रशांत वेळीं सारी सृष्टि रजनीमातेला अगदीं बिलगून निजली होती. मधूनमधून ऐकूं येणाऱ्या कोंबड्यांच्या आरवण्याखेरीज दुसरा कुठलाहि आवाज ऐकूं येत नव्हता. सूर्यविकासी कमळाप्रमाणें विश्व जणूं काय यावेळीं आपल्या पाकळ्या मिटून बसलें होतें. झाडें, त्यांचीं पानें, पांखरें, दारें या सर्वांवर कुणी तरी मोहिनी-मंत्र घातला आहे कीं काय, असा भास झाल्यावाचून राहात नव्हता. पहांटेचा गार वारा एखाद्या भाटाप्रमाणें कसलें तरी गीत गात गात कळिकांच्या कानाशीं लागत होता; पण झोंप पुरी न झाल्यामुळें त्या फक्त या कुशीवरून त्या कुशीवर होत होत्या.

– वि. स. खांडेकर : (

**सूर्यकिरणांची भूपाळी**

सोनेरी सूर्यकिरण शेताच्या अंगावरची धुक्याची दुलई हलकेंच वर करून रोपट्याना ' उठा उठा हो सकाळिक ' म्हणत होते. दंवानें न्हालेलीं कणसें वाऱ्यावर झुलत होतीं आणि त्याच्यावरचीं पाखरेंही त्याच्यासंगें झुलत होतीं. गाडीच्या धडधडाटानें रस्त्याच्या कडेचें एक भिरें भुर्रदिशीं उडालें खरें, पण रिकाम्या चोचीनें खास नव्हे. त्याना आपल्याबरोबरच घरट्यातल्या अज्ञात–पक्ष पिलाचीहि काळजी होती.

— महादेवशास्त्री जोशी : ( तुळजा भवानी )

**धुक्याचा सागर**

मीं उजव्या बाजूला तोंड वळवलें आणि थबकलोंच. समुद्रच होता तो ! पण खाऱ्या पाण्याचा नव्हे, तर धुक्याचा. वासिष्ठी नदींतून ते वर उठलें होतें. तिकडची सारी सृष्टि त्यानें अज्ञातात विलीन केली होती. ' वाढता वाढता वाढे ' अशा क्रमानें तिकडचे डोंगरसुद्धां त्यानें गिळीत आणले होते, कांहींचीं फक्त बोटभर शिखरें वर उरलीं होतीं; पण त्यांचेंही लक्षण ठीक दिसत नव्हतें. अजून लाटाचे लोट वर उठतच होते. पृथ्वी जणूं विरघळून, बाष्परूप होऊन आपल्या ' द्यौस् ' पतीला सर्वांगीं खेंव घायला निघाली होती.

— महादेवशास्त्री जोशी : ( परशुराम क्षेत्र )

सकाळीं अरुणाच्या छटेनें तिचें पाणी रंगूं लागलें कीं, निळें पातळ सोडून ती गुलाबी पातळ नसली आहे असा क्षणभर भास होई.

— र. वा. दिघे : ( रानजाई )

### धुक्याची दुलई

डोंगराच्या कुसाडांतून व खोंदाटांतून धुकें बाहेर पडलें व त्याचे पांढरेशुभ्र पट्टे रानारानांतून घुसूं लागले. त्या धुक्यात प्रचंड वृक्ष, रानें, कडे व गिरि-शिखरें बोल-बोलतां अदृश्य झालीं. प्रथम पिंजलेल्या कापसाचा एक लांबच लांब पट्टा पसरला व थोड्याच वेळांत काळा कडा पायथ्यापासून माथ्यापर्यंत पांढऱ्या दुलईंत गुडूप झाला; जणूं कोणा योगींद्रापासून गुरुमंत्र घेत आहे.

— र. वा. दिघे : ( सराई )

### तलावाचें दृश्य

गौरीशंकर ( भावनगरचा बोर तलाव ) तलावाचें दर्शन अचानक घडतें. आम्ही बगीच्यांत गेलों, झाडींचें सौंदर्य निरखिलें, चिनी मातीच्या तुकड्यांनीं बनविलेले निर्जीव हत्ती, घोडे, वाघ आणि सिंह यांची ऐट पाहून, झाडातून वागटणाऱ्या सजीव पक्षांचा कलरव ऐकत ऐकत तलावाच्या कांठीं येऊन पोहोंचलों. पायऱ्या चढूं लागलों. गार वाऱ्याची झुळूक येऊं लागल्यामुळें मनास शांतता वाटूं लागली. तरीहि तलाव कसा असेल याची कल्पना येत नाहीं. अगदीं शेवटच्या पायरीवर पाय ठेवला म्हणजे जणूं एकाएकी आकाशाचा पट चिरून एकादी अप्सराच आपल्यासमोर अवतीर्ण व्हावी तसें सरोवराचें पाणी स्मित करीत आपणाकडे पाहात असल्याचें दृश्य दिसतें.

— आचार्य कालेलकर : ( संध्यारस )

तुझें कमळ तूं फुलव. तुझा दिवा तुझें हातीं.

— साने गुरुजी

### बालसूर्याचें दर्शन

इतक्यात बालसूर्याचा घुमट आपोळ करून पाण्यातून बाहेर निघाला उगवत्या सूर्याच्या बिंबावर एक विशिष्ट तरलता असते, जणू काय थडगार पाण्यामधून कापत कापत सूर्य बाहेर येत असतो. आणि पाण्यात जो प्रकाश पसरलेला असतो तो म्हणजे जणू काय सूर्याच्या शरीरास चर्चिलेली कृष्णागरूची उटीच धुऊन गेलेली असते

— आचार्य कालेलकर (ब्रह्मदेशाचा प्रवास)

### सूर्योदयाची शोभा

अद्यापि सूर्यबिंब दिसूं लागलें नव्हतें. पण त्याच्या आगमनाच्या स्थळीं जणू काय झगझगीत जरतारी वस्त्राची बिछायतच पसरल्यामारखें वाटत होतें, व त्याची प्रभा सरोवरावर, वृक्षश्रेणीवर व चोहोंबाजूस सारखीच पसरलेली

## सायंकाळचे रंग

टेंकडीवरचे सुंदर रंगाचे खडे ती गोळा करीत होती. ईश्वरानें तेथें मुक्त हस्तानें विखुरलेलीं तीं माणिक-मोतीं ती गोळा करीत होती. सूर्य मावळत होता. त्याचे सुंदर रंग पसरत होते. मावळला सूर्य. मोटार निघून गेल्यावर धुळीचे लोट सुटतात; सूर्य निघून गेल्यावर सौंदर्याचा समुद्र पसरतो.

– साने गुरुजी : ( क्रांति )

## सृष्टींतील रंग-संगति

सायंसूर्याचें कलतें सौम्य ऊन या वेळीं पठाराच्या उंचसखल भागांवर सर्वत्र पसरलें होतें. त्या तिरप्या रक्तकीत उन्हांत पठारावरील रेताळ मातीचा कुठें तांबूस, कुठें अंजिरी तर कुठें पिवळा रंग, पठारावर उगवलेल्या गवताचा कुठें हिरवा, कुठें करडा तर कुठें पोरवा रंग, टेंकड्यावरील पाषाणांचा कुठें काळसर, कुठें तांभळा तर कुठें लाल रंग व निरनिराळ्या प्रकारच्या झाडांच्या कुठें पोपटी, कुठें गर्द हिरवा तर कुठें निळसर रंग अशा नाना प्रकारच्या रंगछटा खुलून दिसत होत्या; व पश्चिमेकडील क्षितिजावर यावेळीं जे पांढरे, काळे, भस्मी, गुलाबी आणि पिवळसर रंगाचे ढग सुस्तपणानें जागोजाग थबकले होते, तेहि सर्व सूर्यप्रभेनें उजळून गेलेले असल्यानें द्यावापृथिवीच्या वेषभूषेंत एक प्रकारची विचित्र रंगसंगति उत्पन्न झाल्यासारखी दिसत होती.

– ग. त्र्यं. माडखोलकर ( अनघा )

## पावसाळ्यांतील सूर्यास्त

संध्याकाळ. नुकतेच मृग लागले होते; त्यामुळें पावसाळ्या सूर्यास्ताच्या प्रभेची नवलाई फुलून आली होती. ओलसर गवत, पुनः हसूं लागलेलीं झाडें प्रसन्न पिवळ्या तेजानें चमकत होतीं. पक्षी विश्वस्तपणें आपल्या घरट्याकडे परतत होते. वेळेवर पाऊस सुरू झाल्यामुळें सर्व तऱ्हेच्या मंदीनें त्रासून गेलेल्या गरिबाच्याहि चेहऱ्यावर आशेचा तजेला दिसूं लागला होता.

— कुसुमावती देशपांडे : ( भाऊ–भाऊ )

## निरोप घेणारा सूर्य

आतां आमच्यासमोर सूर्यास्ताचा देखावा मांडला होता. ढगांचें परचक्र निवारून सूर्यनारायण मोकळा झाला होता, पण तो खालीं जाण्यासाठीं, सागरांत बुडी मारण्यासाठीं. आतां समुद्र आणि सूर्य यांच्यामध्यें फक्त एका वितीचें अंतर उरलें होतें, पण त्यांत डोळे दिपवणारी प्रखरता उरली नव्हती. त्याच्या सहस्र किरणांचाहि संकोच झाला होता.

— महादेवशास्त्री जोशी : ( अलीबागचा पाणकोट )

## सायंकाळची छाया

तो गगनांगणींचा दिवा मालवला. मावळतीच्या क्षितिजावर गुलालाचें पाणी ओतलें. थोडा वेळ त्या बाजूला वणवा लागल्यासारखें दृश्य दिसलें आणि मग हळूंहळूं पश्चिमही पूर्वेप्रमाणेंच दुर्मुखूं लागली.

— महादेवशास्त्री जोशी : ( शिवरायाचा प्रताप )

## सायंकाळीं सागरकांठीं

सघ्याकाळ झाल्यामुळें कावळ्याचे थवेच्या थवे घरट्याकडे परत जात होते. जणू काहीं त्याची शाळा नुकतीच सुटली होती. त्यावेळीं वाऱ्यानें वाळूचे कण कमे मजेदार उडत होते. पाहणाराला वाटावें,त्याची धावण्याची शर्यतच लागली आहे. समुद्राच्या काठावरल्या रानगवताला का कशाला एक प्रकारचें मोठें फूल येतें. तें सुकलें कीं वाऱ्यावर इकडे तिकडे धावूं लागतें. तशीं चारपाच फुलें पाहून मला वाटलें कीं, वाऱ्याच्या लहरी चेंडू घेऊन खेळत आहेत.

— वि. स. खांडेकर : ( उल्का )

## नदीवरील संध्याकाळ

जाई सुवर्णसीमेच्या पात्राकडे एकाग्रतेनें पाहात होती. सायप्रकाशात सुवर्णसीमेचा प्रवाह सोन्याच्या नागिणीसारखा वळसे घेत मैदानातून चालला होता. गाईवासरें गायरानातून परत येत होतीं. पक्षी घरट्याकडे टोळ्या करून उडत होते. पश्चिमेला वरुणाचा रंग पसरला होता. व त्यात शुक्राचा तेजस्वी तारा लखाखत होता.

— र. वा. दिघे : ( रानजाई )

सन्ध्येच्या आगमनामुळें शात शात होत जाणारी खन्डी, दरीच्या कोचीकोचींतून रात्रीची छाया येत होती तेथपर्यंत पसरली होती. त्या किर्र अशा खलाटींतून भातागवताचे, क र ्ऱ्या फुलाचे सुवास सुटले. कारवीचा मादक गंध त्याना रेटू लागला. भु ं गऱ्तीफुलावरून वीणावादन करूं लागले.

— र. वा. दिघे : ( सराई )

## सायंकाळचीं दृश्यें

वारा भणभणत आंत येत होता. त्याच्या प्रत्येक झोताबरोबर समोर जें पिंपळाचें मोठें थोरलें झाड होतें, त्याच्या पर्णबहुल फांद्या इतक्या जोरानें हेलकावत कीं, त्यांचा आवाज ऐकून मोटेचें पाणी धप्दिशीं कोसळल्याचा भास होई. पिंपळाची जी एक जाड उंच फादी डोंगराच्या सुळक्याप्रमाणें वर गेली होती, तिच्या टोंकाला आलेल्या पानांच्या झुबक्यातील आपल्या घरट्यात· बसून घार आपला कर्कश भेदक आवाज काढीत होती. मारुतीपुढच्या मोकळ्या जागेंत आट्यापाट्या खेळत असलेल्या पोरांच्या आरोळ्या आणि पलीकडच्या बाजूला पोवाडे म्हणत असलेल्या लोकांचे ' रामा हो जी जी जी ! ' सूर, दिवसभराच्या काबाडकष्टानंतर मिळालेली सायंकालीन विश्रांति किती मजेंत जाते, याची साक्ष देत होते.

— ग. त्र्यं. माडखोलकर : ( चंदनवाडी )

## खेड्यांतील संध्याकाळ

संध्याकाळच्या अंधुक प्रकाशांत पोपटांचे हिरवे कळप हिरव्या झाडींतून दिसेनासे होत होते. कावळ्यांचीं व बगळ्यांचीं रात्रीं बसण्याचीं निरनिराळीं झाडें ठरलेलीं होतीं. तिकडे ते विश्रांतीकरतां चालले होते. बगळ्यांच्या माळा सात, पांच, नऊ अशा व्यस्त संख्येनें ठराविक व्यूहरचना करून येत होत्या. धनगरांचे हजारों मेंढ्यांचे कळप मेंढवाड्यांत परत येत होते. कळप मेंढवाड्याजवळ आल्याबरोबर जिकडे तिकडे ' बें बें ' आवाजाचा हलकल्लोळ उठला.

— र. वा. दिघे : ( पाणकळा )

### सायंकाळचा आनंद

जिकडे तिकडे रानांत पीक डुलत होतें. हवा अगदीं स्वच्छ होती. धुळीचे कण किंवा धूर कुठेंहि हवेंत उडतांना दिसत नव्हता. संध्याकाळचें ऊन पिकांवर पडून सोनें पिकवीत होतें. क्षणाक्षणाला सुखकर थंडी वाढत होती. गायरानें, मळे, वावरें संध्याकाळच्या प्रकाशांत उजळून दिसत होतीं. बाभळीच्या काटेरानांत पक्षी किलबिल करीत होते. सुगरणींच्या ( Tailor-birds ) घरट्यांतून पिलें आपल्या आया आल्या किंवा नाहींत तें डोकावून पाहात होतीं.

— र. वा. दिघे : ( पाणकळा )

### रान-माळावरील संध्याकाळ

आतां संध्याकाळ जवळ आल्यामुळें सूर्य पश्चिम क्षितिजाकडे झुकला होता. त्याच्या प्रकाशांत तांबूस रंगाची छटा यावयास लागली होती. वारा बंधनांतून मोकळा झाल्यामुळें जोरानें वहात होता. वाऱ्यानें हेलकावे खाणाऱ्या वृक्षशाखांच्या झोंपाळ्यावर बसून चिमुकले पक्षी अस्तोन्मुख सूर्याकडे पाहून चिंव चिंव करीत होते. मधूनच वाऱ्याचा झोत आला कीं मळ्यांतील काळ्या मातीबरोबर चाललेल्या चिपाडांचा भुसा वर हवेंत उडून कांहीं वेळ तांबूस सूर्यप्रकाशांत चकाकत होता.

— ना. सी. फडके : ( कुलाब्याची दांडी )

लहानपणीं जें ऐकावें, जें वाचावें, तें खरें वाटतें. साऱ्या जगावर आपली तेव्हां श्रद्धा असते.

— माने गुरुजी

## मावळत्या उन्हातील डोंगर

आतापर्यंत डोंगरमाथे अस्पष्ट दिसत होते, ते जवळ आले आणि जवळूनहि ती प्रचंड पर्वताची रांग आम्हाला साजरी दिसली. मध्यान्ह थोडी कलली होती सूर्याचीं तिरकीं किरणं पडून, पर्वताचे त्रिकोनी माथे व उतरणी उजळ दिसत होत्या, आणि दऱ्याचा गडद रंग अधिक उठून दिसत होता. सूर्य जसजसा कलू लागला तशी घाटावरची निळ्या पाटऱ्या छाया प्रकाशाची हालचाल अधिक विलोभनीय दिसू लागली.

सौ. कमला फडके ' ( त्रिवेंद्रमची सफर )

## संधिप्रकाशातील रंगकाम

ती संध्याकाळची वेळ होती. सबंध दरी संध्याप्रकाशानें उजळली. रानाचे, भाताचे, गवताचे हिरवे, पोपटी, पिवळे रंग, कड्याचे, डोंगराचे निळे, जांभळे, काळे रंग त्या सोनेरी किरणात निरनिराळ्या रंगाचे उठाव करीत मिसळले. त्या सोनेरी उन्हात हिरवें रान सोन्यावर केलेल्या हिरव्या मिन्याप्रमाणें चमकत होतें. दरीचे वर आकाशात निग्वारलेल्या ढगाची खार पडली. पश्चिमेकडील एका लांबच्या निळ्या डोंगरामागें सूर्य मावळत होता. संधिप्रकाश त्या निळ्या डोंगरामागून आगीच्या लोंढ्याप्रमाणें भटकला. तो संधिप्रकाश निखारलेल्या ढगावर पडून रंगाच्या, समुद्राला, जधाण, यावें व तो, दरीच्या, आखातात, शिरावा असा देखावा दिसू लागला.

– र. वा दिघे : ( सराई )

### सूर्यास्ताचा देखावा

सूर्यास्ताची वेळ झाल्यामुळें झाडाच्या पानांत आश्रय घेण्यासाठीं थव्याथव्यांनीं येणाऱ्या पक्षांचा किलकिलाट सारखा चालू होता. पिंपळाच्या पारावर जो तेल, शेंदूर फासलेला उघडाबागडा मारुती उभा होता, त्याच्या दर्शनामाठीं हातांत मिणमिण करणारी पणती घेऊन किंवा कणकेच्या दिव्यांची आरती पदराखालीं झांकून निघालेल्या बायकांची किनऱ्या कसण सुरांतलीं गाणीं कानावर पडत होतीं.

— ग. त्र्यं. माडखोलकर : ( चंदनवाडी )

### सायंकाळची शांतता

उघड्यावरच बांधलेलीं जनावरं तोंडांत धरलेल्या कडब्याचा आवाज करीत होतीं. त्यांच्या गळ्यांतलीं घुंगरं मधेंच वाजत होतीं. झोंपड्यापाठीमागें वेळूचं व्हानसं बेट होतं. त्यांत वाऱ्याची लकेर सळसळून वाजत होती. साऱ्या वस्तु झराझर अस्पष्ट व्हायला लागल्या होत्या. जणू कोणाची तरी चाहूल ध्यावयासाठीं श्वसनक्रिया आवरल्याप्रमाणें दिशा स्तब्ध व्हायला लागल्या होत्या.

— ना. सी. फडके : ( झंझावात )

### सायंकाळची सृष्टी

अस्ताला जात असलेल्या सूर्याच्या किरणा पिवळसर प्रभेचा लोट दिवाणखान्यांत पसरला होता. त्या प्रकाशांत समोरच्या एका नवीनच बांधलेल्या टुमदार बंगल्याच्या खिडक्यांचीं तावदानें लखलखत होतीं. झाडांच्या सांवल्या विरळून जाऊन अदृश्य होत होत्या आणि त्यांची पर्णराजी मात्र झपाट्यानें काळवंडत चालली होती.

— ग. त्र्यं. माडखोलकर : ( नवे संसार )

आ...चा चन्द्र

...वें निस्तेज होऊन बहुतेक दिसेनाशींच झालेलीं ... चंद्र मात्र आकाशाच्या मध्यभागीं एकटाच आपल्या ...-समयाची वाट पाहात बसलेला होता. त्याच्याकडे ...हिलें असतां स्वर्गातील एखाद्या देवाचा हा सुवर्णमयी रथ ...ाहे कीं काय किंवा एखादा कांचनदेही राजहंस पक्षी ...ाकाशांतल्या स्वच्छ उदकामध्यें प्रातःस्नान करून ...ोहत बसला आहे कीं काय असा भास उत्पन्न होई.

— शि. म. परांजपे : ( शिवाजीचें पुण्याहवाचन )

### ढगांतील चन्द्रकोर

पश्चिम क्षितिजावर तृतीयेची चंद्रकोर गुरगुरणाऱ्या ढगाच्या रांगातून वाट काढीत होती. तिचें सौम्य गुलाबी तेज डोळ्यांना सुखवीत होतें, क्षितिजाच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत मधूनच लखलखणारी वीज आपल्या तेजस्वीतेनें डोळे दिपवीत होती.

– ग. त्र्यं. माडखोलकर : ( अनघा )

### लखलखणारी चंद्रकोर

श्रावण महिन्यातल्या धुंद चांदण्याची धूसर रम्यता त्याच्यासभोंवतीं पसरली होती. सायंकाळीं जोराची सर येऊन गेल्यामुळें स्वच्छ झालेल्या पश्चिम क्षितिजावर जो एकच काळाभोर ढग आता कडेपासून वरपर्यंत निमुळता होत पसरला होता, त्याच्या टोंकाशीं लखलखत असलेली चंद्रकला पाहून, भगवान चंद्रमौलीच्या भव्य जटाजूटाचें स्मरण होत होतें.

– ग. त्र्यं. माडखोलकर : ( अनघा )

### मावळती चन्द्रकोर

तृतीयेच्या चंद्राची निमुळती, पिवळसर कोर अगदीं बुडावयाच्या बेताला आली होती. भरतीमुळें वेगानें उसळत असलेलें समुद्राचें निळें पाणी तिला गिळून टाकण्यासाठीं धडपड करीत होतें जणू काहीं. त्या मावळत्या चंद्रकलेचें सौम्य चांदणें क्षणोक्षणीं फिकें पडत चाललें होतें,व त्याच्या मंद प्रकाशांत समुद्राच्या लाटा सर्पांच्या अंगावरील खवल्यासारख्या चमकत होत्या.

– ग. त्र्यं. माडखोलकर : ( भगलेलें देऊळ )

**आकाशींचा चन्द्र**

नक्षत्रें निस्तेज होऊन बहुतेक दिसेनाशींच झालेलीं होतीं. चंद्र मात्र आकाशाच्या मध्यभागीं एकटाच आपल्या अस्त-समयाची वाट पाहात बसलेला होता. त्याच्याकडे पाहिलें असतां स्वर्गांतील एकाद्या देवाचा हा सुवर्णमयी रथ आहे कीं काय किंवा एकादा कांचनदेही राजहंस पक्षी आकाशगंगेच्या स्वच्छ उदकामध्यें प्रातःस्नान करून पोहत बसला आहे कीं काय असा भास उत्पन्न होई.

— शि. म. परांजपे : ( शिवाजीचें पुण्याहवाचन

**सायंकाळचा देखावा**

आता सूर्य खूपच खालीं उतरला होता. लहरत्या सागरावर त्याचा लांबच लांब प्रकाशपट्टा पसरला होता. हेमंत आपल्या शीतालाचा मंत्र जपूं लागला होता. झाडा-माडांच्या छाया सुतासारख्या दिसूं लागल्या होत्या.

— महादेवशास्त्री जोशी : ( विजयदुर्ग

**नदींतील कमळ**

जाईनें श्रीकमळ दुर्गावरून खालीं पुण्यसलिला सुवर्ण-सीमेंत सोडलें, तें राजहंसाप्रमाणें तरंगत तरंगत लांब पश्चिमे-कडे वाहात गेलें. जाई त्याच्याकडे शून्य दृष्टीनें पाहात राहिली. जाईनें पश्चिमाकाशाकडे दृष्टि केली. वरुणाचलाच्या बाजूनें वरुणाचे रंग पसरले होते व त्यांत वासंतिक प्रतिपत्-चंद्रलेखा अमृताच्या पात्राप्रमाणें चमकत होती.

— र. वा. दिघे : ( रानजाई )

रात्रीच्या काळोखाचा प्रवाह उषःकालच्या प्रकाशा-कडे वहात असतो.

— वि. वा. शिरवाडकर

## झाडांतील कवडसे

त्या ठिकाणीं चादणे पटलें होतें असें म्हणण्यापेक्षा चादण्या पटल्या होत्या असें म्हणणेंच जास्त बरोबर होईल. कारण वृक्षाच्या दाट गर्दींतून चादण्याचे अनेक बारीक ठिपके इकडे तिकडे शिंपडल्यासारखे त्यावेळीं भासत होते. आणि वृक्षाच्या खाद्या जशा जशा मदपणें हालत तशा तशा या ठिपक्याच्या जागा भराभर बदलत, त्यामुळें यमुनेच्या प्रवाहातील लाटाप्रमाणें, त्या जागेंत पटलेल्या चादण्याच्या प्रकाशाच्या लहान-मोठ्या ठिपक्याना सारखीं आदोलनें मिळत होतीं.

— ना. सी. फडके · ( अल्ला हो अकबर ! )

## चांदण्यांतील गोपुरें

मदुरा शहरातून फेरफटका करून आम्ही पुन्हा मीनाक्षीच्या मदिराकडे आलों. सकाळीं सूर्यप्रकाशात आम्हीं गोपुराची शोभा पाहिली होती. आता चद्रप्रकाशात ती पुन्हा पाहण्यासाठीं आम्ही आलों होतों. आकाशात चादण्याची कोवळी प्रभा फाकू लागली होती. त्या सतेज उजळ निळ्या पार्श्वभूमीवर चारी गोपुर अधिकच भव्य दिसत होतीं. चद्रप्रकाशात मीनाक्षीच्या प्रचड मदिराची शोभा 'स्वर्गीय वाटली. एक प्रचड कलास्वप्न पुढ उभं असल्याचा भ्रम नेत्राना झाला.

— सौ. कमला फडके . ( निंद्रमूची सफर )

आकाशापासून पृथ्वीपर्यंत चादण्याचा सागर पसरला होता. समुद्राच्या तळाशीं बुडून गेलेल्या पर्वताप्रमाणें टेंकडी दिसत होती.

— वि. स. खाण्डेकर : ( काचनमृग )

चांदण्यांचा धवधवा

वद्य पक्षांतील चंद्र काळ्या कड्यावर कैलासपर्वताच्या शिखराप्रमाणें झळकूं लागला. काळ्या कड्यावरून चंद्राचे किरण भैरवाच्या सोंडींतून अशा रीतीनें पडले होते कीं, चांदण्याचा एक विन आवाजाचा धवधवाच तेथें निर्माण झाला आहे असा भास होई.

— र. वा. दिघे : ( सराई )

चांदण्यांचा मुलामा

वैशाखीच्या प्रखर चांदण्यानें यावेळीं सारें स्थिरचर अगदीं उजळून गेलें होतें. एरवीं कठोर, निव्वळ दिसणाऱ्या डोंगराच्या क्षितिजाशीं समांतर असलेल्या शिखररेषांनासुद्धां त्या धवल प्रकाशांत एक प्रकारची मृदु पांडुरता आली होती. आकाशाहि आपला स्वाभाविक नीलिमा टाकून देऊन इतकें स्वच्छ, शुभ्र आणि सतेज दिसत होतें कीं, स्वर्गंगेला पूर येऊन तिचा तेजोरस साऱ्या द्यावापृथिवीवर ओसंडला आहे कीं काय, असा भास होत होता.

— ग. त्र्यं. माडखोलकर : ( अनघा )

चांदण्याची जादू

संध्याकाळ होऊन गेली होती. दोघेंहि विश्रांतीकरितां ओढ्याच्या काठच्या एका प्रशांत जागीं जाऊन बसलीं. वरून शुद्धपक्षांतलें चांदणें अमृताचे तुषार उधळीत होतें. त्यामुळें ओढ्याच्या बाजूच्या खडकांना संगमरवरी दगडांची आणि वामलींना पारिजातकाच्या झाडांची शोभा आली

— वि. स. खांडेकर : ( हिरवा चाफा )

## मूर्तिमंत प्रसन्नता

रात्र निरभ्र व चांदणी असल्यामुळें रस्त्यानें जातांना तिघींचींहि मनें प्रसन्न झालीं. आकाशांत चंद्र गात असून त्या गाण्यानें केलेला ब्रह्मानंदच चादण्याच्या रूपानें पृथ्वीवर पाझरत आहे असा त्यांना क्षणभर भास झाला. चम्‌चम् करणाऱ्या तारका जणूं काहीं त्या स्वर्गीय गायकाचें गाणें ऐकून डुलतच होत्या. निराशेच्या विचाराची आठवण करून देणारे मेघ त्या गाण्याच्या सुरानीं अगदीं पांगून गेले होते. त्या बंदराजवळ आल्या तसतसें लाटांचें गीतहि त्यांना स्पष्टपणें ऐकूं येऊं लागलें.

– वि. स. खांडेकर : ( कांचनमृग

## चांदण्यांतील दगड

पठारावर मध्येंच कुठें तरी उभ्या असलेल्या प्रचंड शिळा चंद्रकिरणांतलें अमृत पिऊन सुस्त पडलेल्या आदि-युगीन अजस्र श्वापदासारख्या दिसत होत्या. पुनवेच्या त्या चंदेरी मायेंत वस्तुमात्राचें स्वरूप आणि स्वभाव हीं दोन्हीं जणूं बदलून गेलीं होतीं.

– ग. त्र्यं. माडखोलकर : ( अनघा )

## चांदण्यांतील वनश्री

जेष्ठाष्टमीचा चंद्र आता कलला होता. त्याच्या छाया-संकुल प्रकाशांत भोंवतालची वनश्री किंचित् उजळलेली पण श्यामल दिसत होती. जणूं चांदण्याचें शुभ्र–विरल दुकूल अंगावर घेतल्यामुळें तिची सांवळी कांति खुलून दिसत होती. वाऱ्याच्या गार झुळका सावल्यांशीं खेळत होत्या.

– ग. त्र्यं. माडखोलकर : ( अनघा )

चंद्रिकेंतील नदीकांठ

जिकडे तिकडे शांतता पसरली असल्यामुळें यमुनेचा प्रवाह फारच गंभीर वाटत होता. चांदण्यांचीं किरणें पाण्यावर नाचत असल्यामुळें आकाशांतील अनंत नक्षत्रांचा पाऊस खालच्या पाण्यांत पडल्यासारखा दिसत होता. चांदण्यामुळें अधिक उल्हसित झालेला एकादा जलपक्षी पाण्याच्या पृष्ठभागावरून आपली चोंच चोरटे-पणानें फिरवून पुनः उंच उडतांना मोठें वहारीचें पण साधें मंजळ स्वर काढीत होता. चोरट्याप्रमाणें चंद्रिकेचा आस्वाद घेत घेत वारा अगदीं दबकत दबकत हवेंत उड्या घेत होता. त्या मंद लहरींमुळें नदीच्या कांठचीं बारीक झुडपें हाल्ल्यासारखीं होत होतीं.

—ना. सी. फडके : (अला हो अकबर !)

काजव्यांचें तेज

आकाशांत पावसाळी ढग हत्तीच्या कळपाप्रमाणें जमा झाले होते. त्यांनीं रात्रीचा काळोख इतका गडद केला होता कीं, काजव्यांशिवाय कांहीं दिसत नव्हतें. झाडांवर काजवे, कमळांवर काजवे, पानांवर काजवे, रानजाईच्या वेलांवर काजवे ! आकाशांत नक्षत्रें चमकत आहेत, कीं काजवे लुकलुकत आहेत, कांहींच कळत नव्हतें. —

### चांदण्यांतील लाटा

आम्ही खालीं उतरून वाकांवर जाऊन बसलों. चंद्र या वेळीं मध्यावर आलेला होता. त्याच्या धूसर चांदण्यात सारी सृष्टि गुरफटून, धुरकटून गेल्यासारखी दिसत होती; त्या वेदिस्त समुद्राच्या लाटा, आवरून धरलेल्या भावनाप्रमाणें, जागच्या जागीं उसळून लय पावत होत्या. कचित् एकाददुसरा अश्रु जसा त्या भावनाच्या उसळीसरसा डोळ्यातून टिबकावा, तसे लाटाच्या धडकीसरसे त्याचे विरळ तुषार अंगावर येत.

– ग. त्र्यं. माडखोलकर : ( भंगलेलें देऊळ )

### चांदणें व सुगंध

माही पौर्णिमेची रात्र होती. शात सजलपूरवर चांदीच्या रसाचा वर्षाव चालू होता. सुगंधाच्या दर्यात तुफान चाललें होतें. त्यात पारिजातकाच्या सुवासाची भर पडली होती. सर्व शेतकरी निद्रिस्त होते. नदींतील टिटव्या व चिंचेवरील–उंबरावरील घुबडें मात्र जागीं होतीं. तीं घू घू करीत होतीं ! खळ्यावरून पेटवलेल्या शगटी लावून दिसत होत्या. या सुवासाचा, या सृष्टीसौंदर्याचा चद्राशिवाय कोणी उपभोग घेत नव्हतें. तो मात्र वरून खूप होऊन हंसत होता. त्याच्या भीतीनें सावल्यानीं झाडांचे पाय धरले होते

– र. वा. दिघे : ( पाणकळा )

आपलं सुख दुसऱ्याच्या दुःखावर उभारणं यासारखं दुसरं पाप जगात नाहीं !

– वि. स खांडेकर

## चांदण्यांतील नौकाविहार

चहूं बाजूला इतकें शांत आणि स्तब्ध होतें, कीं शांततेच्या समुद्रांतच पडल्यासारखें मनाला वाटत होतें. दोन्ही किनाऱ्यावरील झाडाझुडपांचा फार आल्हाददायक नाहीं व फार उग्र नाहीं असा एक विलक्षण मिश्र गंध येत होता. वारा अगदीं मंदपणें वहात होता, आणि त्यामुळें उत्पन्न होणाऱ्या लहान लहान लाटांनीं आमची होडी इतक्या सूक्ष्मपणें हालत होती, कीं तिच्यावरून जमिनीला सूक्ष्म स्पर्श करीत पावलें टाकणाऱ्या कुशल नर्तकीची आठवण होत होती.

— ना. सी. फडके : (कुलाब्याची दांडी)

## चांदण्यांतील प्रवास

मध्येंच गर्द झाडी लागली कीं, चंदेरी ठिपक्याचं कलाबूत काम ज्यावर केलेलं आहे अशा काळ्यासांवळ्या वस्त्रावरून गाडी चालल्यासारखा भास होई. पत्र्याची किलकिल हलके हलके मंदावत होती. सृष्टीवर पसरलेला चंद्रिकेचा थर अधिक दाट होत चालला होता. स्वच्छ निळ्या आभाळांत चांदण्या तुरळक दिसत होत्या. भोंवतालच्या वनश्रीवर चंद्रकिरणाचे झोत पडले होते आणि हिरव्या, पिवळ्या व चंदेरी रंगांच्या मिश्रणाचें सड जिकडे तिकडे उधळल्यासारखे दिसत होते. गाडीला जोडलेल्या पांढऱ्यासफेत बैलांचीं अंगें चांदण्यांत चकाकत होतीं, व पोळ्याच्या दिवशीं रंगविलेल्या त्यांच्या शिंगांचा आतां जरा फिका झालेला लालपणा शोभून दिसत होता

— ना. सी. फडके : (संसारवास)